






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

मराठी अभ्यास परिषद पत्रिका

# भाषा आणि जीवन

वर्ष १० : २ : उन्हाळा १९९२

एक एम नावाचा उंदीर होता
त्याला ऐंशी रुपये पगार होता
त्याने त्याचा पगार चार हजार
चारशे चव्वेचाळीस रुपये
साठवला... गाठोडे बांधले
आणि निघून गेला...



अनुक्रमणिका

अनुक्रम



---

**प्रकाशन :** त्रैमासिक (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)
**संपादन समिती :** कल्याण काळे (प्रमुख), अशोक रा. केळकर, अंजली सोमण,
द. दि. पुंडे, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्न्सन, विजया देव, आशा मुंडले,
मृणालिनी शहा.
**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** कल्याण काळे, मराठी विभाग, पुणे विद्यापीठ,
पुणे ४११ ००७ (दूरध्वनी : ३३६०६१/२४)
**व्यवस्थापकीय संपर्क व पैशाचा भरणा :** मृणालिनी शहा, १ शीतल अपार्टमेंट्स्, ४६/४
एरंडवणे, पुणे ४११ ००४ (दूरध्वनी ३३३८६९)
**पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरणपृष्ठ तीन पाहा.
**सूचना :** पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद
सहमत असतीलच, असे नाही.
या अंकाच्या मुद्रणासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले
आहे.

---

संपादक : कल्याण काळे / प्रकाशक व मुद्रक : मराठी अभ्यास परिषदेसाठी मृणालिनी शहा
मुखपृष्ठ / श्याम देशपांडे
मुद्रणस्थळ : संजीव मुद्रणालय, ४६९ सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०.

संपादकीय

# पचवून टाकलेले वाघिणीचे दूध

आज मराठी आणि इंग्रजी या भाषांची एकमेकींशी लव्ह्-हेट् रिलेशनशिप आहे, असं म्हणता येईल. तुझं माझं जमेना आणि तुझ्यावाचून करमेना असाच हा प्रकार. याची कारणं अर्थातच राजकीय आणि सांस्कृतिक आहेत. परंतु या दोघींची ही गोष्ट एकसुरी नाही. त्यात अनेक टप्पे आहेत. सुरुवातीला या दोघी शेजारणी होत्या. ओळख वाढवू पाहत होत्या.

अव्वल इंग्रजी हा पहिला महत्त्वाचा काळ मानावा लागेल. म्हणजे सुमारे १८५० पासून ते १९२० पर्यंत. १९२० नंतर आधुनिक काळ सुरू झाला, तो स्वातंत्र्यापर्यंत. १८५० च्या आधी इंग्रजी जाणणारी माणसे महाराष्ट्रात इतकी कमी होती, की संपूर्ण मराठी भाषेवर त्यांचा ठसा उमटणे त्यामानाने कठीणच होते. शिवाय तोपर्यंत इंग्रज आज ना उद्या जातील, ही भावना तर होतीच; पण समजा, राहिले, तरी मुसलमान राज्यकर्त्यांपेक्षा ते किती वेगळे आहेत, याचीही पुरेशी कल्पना नव्हती.

इंग्रजी जाणणाऱ्या दुभाष्यांच्या साहाय्याने पेशवेकाळातही इंग्रजांशी वाटाघाटी होत. दुसऱ्या बाजीरावाने चहा आणि घड्याळ यांसारख्या नव्या गोष्टींचाही आपल्या जीवनात स्वीकार केला होता; पण तरी सुद्धा मराठी संभ्रांत (उच्चभ्रू) माणूस इंग्रजीबद्दल दूरत्व बाळगून होता, हे निश्चित.

राणीच्या जाहीरनाम्यानंतर (१८५८) खऱ्या अर्थाने इंग्रजी भाषा इथे खोलवर रुजली. अव्वल इंग्रजीच्या काळात मराठी भाषा समृद्ध व्हावी, या हेतूने परिश्रमपूर्वक अनेक शब्द मराठीत रूढ करण्यात आले.

आज अनेकांना हे शब्द किंवा हे वाक्प्रयोग म्हणजे पचवून टाकलेले वाघिणीचे दूध आहे, याची अजिबात जाणीव नाही. मूळ मराठी जीवनात ह्या काळापूर्वी हे शब्द किंवा प्रयोग नव्हते. इतकेच नव्हे, तर ती उघडउघड भाषांतरे आहेत. त्यांतली काही उदाहरणे देणे हा या लेखाचा उद्देश आहे. मात्र तो रंजक माहिती पुरवणे इतका मर्यादित नाही. ती उदाहरणे देण्यामागे माझी भूमिका अशी आहे, की प्रयत्नपूर्वक आणि सरळपणे, न्यूनगंड किंवा अहंगंड न ठेवता, जे उपयुक्त ते उचलावे, या माफक आणि अनाक्रमक दृष्टीमुळे मराठी खरोखरच समृद्ध झाली. कदाचित आजही अव्वल इंग्रजी जमान्यातली ही दृष्टी आपण ठेवली, तर मराठी - इंग्रजी रस्सीखेच कमी होईल. आज विनाकारणच असा प्रचार केला जातो, की अमुक तमुक ज्ञान मराठीत मांडताच येणार नाही. या प्रचारात तथाकथित विचारवंतही सामील आहेत. उलट,

उरलेले अनेक विचारवंत मराठीची 'शुद्धता' या विचित्र कल्पनेत अडकलेले आहेत. जणू काही शुद्धता म्हणजे संस्कृतप्रचुरता, असे यांना वाटते.

परंतु अव्वल इंग्रजीत अनेकांची धारणा होती, की जे आम्हांस हवे, ते आम्ही मराठीतून लोकांपर्यंत पोहोचवू. त्यातून शब्द घडत गेले; रूढ झाले. आज याच निरोगी प्रयत्नांची गरज आहे. फक्त इंग्रजीच्या बाबतीतच नव्हे, तर जगातल्या सर्व प्रमुख भाषांबाबत जर्मन भाषेतला वेल्टाशहाऊंग इंग्रजीत वर्ल्ड-व्ह्यू झाला. मराठीत जगाकडे पाहण्याची सम्यक दृष्टी असा झाला आहे. यातून हे स्पष्ट होते, की शब्दाला शब्द कृत्रिमपणे निर्माण करणाऱ्या 'समित्यां' पेक्षा अ[illegible] खुली जुळवणी नैसर्गिक ठरेल. अर्थ आला पाहिजे. मग तो एकास एक शब्दात नसला, तरी चालेल.

पूर्वीची उदाहरणे पाहू या. पुशकार्टसाठी ढकलगाडी. हँडकार्टसाठी हातगाडी. काळ्या ढगांना रुपेरी कड किंवा किनार हे 'एव्हरी क्लाउड हॅज अ सिल्व्हर लायनिंगसाठी. 'इफ माय ऑन्ट हॅड व्हिस्कर्स, शी वुड बी माय अंकल' याचे रूपांतर आत्याबाईला मिशा असल्या, तर तिला काका म्हटले असते. मिस्टरसाठी श्रीयुत, मिसेस्‌मध्ये आपण सधवा-विधवा भेद मानला व त्याबद्दल सौभाग्यवती आणि श्रीमती वापरत होतो. आता दोहोंसाठी श्रीमती रूढ होते आहे.

राजमान्य राजश्री हे राइट ऑनरेबलसाठी होते. श्री. रा. रा. असे लिहीत, रॉब पीटर टु पे पॉल याबद्दल काळूचे ऋण काढून बाळूचे देणे भागवायचे, असे म्हणत. सोम्या-गोम्या हा शब्द असाच एनी टॉम, डिक अँड हॅरीसाठी झालेला. 'हा कोण्या झाडाचा पाला' पण त्यातलाच बाहेरून आलेला.

सत्य सूर्यप्रकाशाइतके स्पष्ट आहे, हे वचनही असेच. 'इट इज क्लिअर ॲज डेलाईट'साठी. बडा माणूस जंटलमनसाठी वापरत. किंवा सद्‌गृहस्थ. विचित्र हा शब्द स्ट्रेंजसाठी वापरलेला दिसतो. गूढ हा शब्द मिस्टीरिअससाठी. याखेरीज 'सुरस आणि चमत्कारिक' हेही इंग्रजीतूनच घेतलेले वर्णन. अद्‌भुत हा शब्दही इंग्रजीलाच पर्याय.

'या कानातून ऐकून त्या कानाने सोडून देणार' चे मूळही इंग्रजी आणि माऊथवॉटरिंगसाठी तोंडाला पाणी सुटणे हा मराठी पर्याय मॅटर अंडर कन्सिडरेशनसाठी विचाराधीन.

सशाचे काळीज हा शब्दप्रयोग असाच मूळ परकीय. कोकरासारखा गरीबही त्यातलाच. ससा काय किंवा कोकरू काय, येथील उच्चभ्रूंच्या नित्य सहवासात नव्हतेच कधी. फार काय, उच्चभ्रूसुद्धा मूळचे हायब्राऊच. ग्रीन पाश्चर्ससाठी हिरवी कुरणे. सिंपलटन्‌साठी साधाभोळा.

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात प्रसिद्ध झालेली सर्वच मराठी पुस्तके या दृष्टीने लक्षणीय आहेत. शासनाची वाट न पाहता लेखक मनानेच धडाधड शब्द वापरताना दिसतात. एकाने वापरला आणि दुसऱ्याने पटला, की उचलला. यामुळे त्यांचा प्रसार झालेला आहे. वर्तमानपत्रांनी यात मोलाची कामगिरी बजावलेली आहे. 'जाड ठशातला' मजकूर म्हणजे

बोल्ड टाईप. वर्गणी, वर्गणीदार, असेच बनवलेले शब्द. 'काळ्या दगडावरची रेघ' सुद्धा अशीच मूळ परकीय.

पेशवेकालीन मराठी आणि अव्वल इंग्रजीतले मराठी यांत एवढा प्रचंड बदल दिसतो, याचे कारण त्या काळच्या सुशिक्षितांची (अर्थात वेल एज्युकेटेड) प्रचंड तळमळ आणि उद्योगप्रियता - भाषेच्या बाबतीतली.

आता मात्र इंग्रजीतून शिकलेले लोक या प्रयत्नात कमी पडतात. काही ठरावीकच लोकांना इंग्रजी यावे आणि त्यांचाच वरचश्मा राहावा, अशाच हेतूने तथाकथित विद्वज्जन (स्कॉलर्स) वागतात, असे वाटण्याइतकी परिस्थिती गंभीर आहे. देखावा (सीनसाठी), पाणलोटक्षेत्र, सदाहरितपर्णी वृक्ष - कितीतरी शब्दप्रयोग त्या वेळी सहज मान्य झाले, असे बेमालूम मिसळले, की मराठीत नव्हते, असे वाटतच नाही. साधा बटाटाच पाहा. पोटॅटोशी नादसाम्य असणारा, कप, स्टोव्हसारखे तत्समही तेव्हा आपण घेतले. मला कधीकधी वाटते, की देशाभिमान, स्वातंत्र्यप्रेम आणि भाषाशुद्धी (म्हणजे अर्थात संस्कृतनिष्ठा) यांची गल्लत झाल्याने मराठीचे नुकसानच झाले. आणि नंतरच्या काळात इंग्रजीतून ज्ञान मराठीत आणण्याची धडपड मंदावली.

आपण इंग्रजी शिकून वरवर चढत जायचे आणि तो सवतासुभा जास्त विस्तारित होऊ द्यायचा नाही, हे आत्मघातकी धोरण नंतरच्या शिक्षितांनी अंगीकारले. आपापसांत इंग्रजीतच व्यवहार ठेवायचा आणि सामान्य माणूस (कॉमनमॅन) काही विचारू लागला, तर पाणी घालून (वॉटर्ड डाऊन) जुजबी माहिती पुरवायची, हे धोरण जे सुरू आले, ते आजपर्यंत तसेच आहे. माध्यमाचा प्रश्न यामुळेच बिकट झाला आहे. आणखी उदाहरणे देऊन लेख वाढवण्याऐवजी मी वाचकांना सुचवते, की १९ व्या शतकातली पुस्तके या दृष्टीने वाचून पाहा. पावलोपावली (ॲट एव्हरी स्टेप) देशी पोशाखातली इंग्रजी भेटेल.

**तळटीप -** वाघिणीचे दूध हा संदर्भ सर्वांना कळेल, असे समजते. विष्णुशास्त्री चिपळोणकरांनी इंग्रजी भाषेची तुलना वाघिणीच्या दुधाशी केली व तत्कालीन समजुतीप्रमाणे वाघिणीचे दूध प्यायल्यास मानवी बालक सुदृढ होते, त्याप्रमाणे मराठीने सशक्त होण्यासाठी इंग्रजीतली ज्ञानसंपत्ती घ्यावी, असे सुचवले.

**आशा मुंडले**

# ज्ञानेश्वरी आणि तेलुगू

प्र. ग. लाळे

'ज्ञानेश्वर आणि ज्ञानेश्वरी' या पद-द्वयात महाराष्ट्राची अस्मिता साठविली आहे. हे दोन्ही शब्द प्रत्येक महाराष्ट्रीयाच्या अंतःकरणात उन्मेषाचे भरते आणतात. ज्ञानेश्वरीच्या रचनेनंतर महाराष्ट्राच्या साहित्यात, विशेषतः संतसाहित्यात, बहुमोल भर पडली आहे. 'ज्ञानेश्वरी' च्या सप्तशताब्दीनिमित्त महाराष्ट्राच्या साहित्यिक- सांस्कृतिक परंपरेचे भरपूर आलोडन झाले आहे. अनेक विद्वानांनी निरनिराळ्या अंगांनी ज्ञानेश्वरीचे मूल्यांकन केले आहे. रत्नाची प्रभा कोठूनही प्रतीत होते. कोठल्याही दिशेने पाहिले, तरी त्याची कांती तितकीच झळकत असलेली पाहावयास मिळते. ज्ञानेश्वरीचा उत्तम आशय, तिची रचनाशैली, ज्ञानेश्वरांचे गंभीर शास्त्रीय ज्ञान या विषयांवर अनेक विद्वानांनी ग्रंथोत्तम लिहून मराठी वाचकांस भरपूर विचारधन पुरविले आहे. 'मराठीचिये नगरी ब्रह्मविद्येचा सुकाळ' कसा झाला, याचीही चर्चा बरीच झाली आहे. त्या सर्व ऊहापोहात शिरण्याची माझी योग्यता नाही. त्यामुळे ज्ञानेश्वरीसंबंधीच्या एका मुद्द्यासंबंधीच थोडीशी माहिती देण्याचा मी प्रयत्न करणार आहे.

काही कारणामुळे ज्ञानेश्वरी वाचण्याचा सुयोग मला लाभला. त्या वेळी काही विशेष शब्दांनी माझे लक्ष आकृष्ट करून घेतले. काही शब्द वाचता-वाचता मन भूतकाळात जाऊ लागले. ज्ञानेश्वरीच्या काही पदांची व्युत्पत्ती संस्कृत-प्राकृत भाषांतील शब्दांपासून दाखविण्याचे प्रयत्न अनेक विद्वानांनी केले. (उदा. राजवाडे, पेठे, वेलिंगकर, पानसे). मराठी भाषा ही प्राकृतजन्य असल्यामुळे तसा प्रयत्न करणे हे अगदीच वाजवी होते. पण मला असे काही शब्द मिळाले, की त्यांची व्युत्पत्ती ठरावीक पध्दतीने, म्हणजे जन्य-जनक- संबंधांचे विवरण देऊन, करता येण्याजोगी नाही. असे जे काही दुर्वचनीय, किंवा अनिर्वाच्य शब्द असतात, त्यांना प्राचीन अभ्यासकांनी 'देशी' असे संबोधिले आहे. परंतु त्यांतील काही शब्दांची लगट दक्षिणेतील भाषांशी असण्याची शक्यता आहे; असा एक विचार माझ्या मनात चमकला. माझा तेलुगू भाषेशी थोडासा संबंध आला आहे. त्यामुळे काही पदे संस्कृत-प्राकृतपेक्षा तेलुगूशी अधिक जवळ आहेत, असे माझ्या लक्षात आले.

साहजिकच असा प्रश्न येतो, की ज्ञानेश्वरीच्या काळात अर्थात इ.स.च्या तेराव्या शतकात, मराठी-तेलुगू यांचे परस्पर संबंध कसे होते ? भाषिक आदान-प्रदानाची तीन-चार कारणे

संभवतात. उदाहरणार्थ, भौगोलिक संलग्नता, विद्वानांचे तसेच सामान्य प्राकृत जनांचे परस्पर संबंध, दोन्ही भाषांचा मूल स्रोत एक असणे, एकाच राजकीय अमलाखाली दोन्ही प्रांत बराच काळ असणे, इत्यादी.

वरील निकषांवर मराठी-तेलुगू भाषांच्या संबंधांची समीक्षा करणे, हे एक व्यापक, कष्टसाध्य कार्य आहे; अभ्यासाचे एक मोठे क्षेत्र आहे. त्यासाठी अभ्यासकांस दोन्ही भाषांवर प्रभुत्व असावे लागते. मी या दोन्ही भाषांचा एक सामान्य वाचक असल्यामुळे ते काम करण्यासाठी अजून तरी माझी योग्यता पुरी पडणार नाही. तरीपण विद्वान अभ्यासकांसमोर एखादा विचार मांडता आला; तर तो लाभदायक होईल, या हेतूने हा विचार मी मांडीत आहे.

ज्ञानेश्वरांच्या काळात आंध्र भागात काकतीय राजांचे राज्य होते. इ.स. ११५० ते १२२३ या काळात अनेक काकतीय राजे सत्तेवर आले व गेले. त्यांची राजधानी एकशिलानगरी, आरूगल्लू किंवा वरंगळ येथे होती. 'काकती' ही त्यांची कुलदेवता होती. तिच्याविषयाच्या भक्तीच्या पोटी त्या राजांनी स्वतःला 'काकतीय' म्हणवून घेतले असावे. त्यांच्यापूर्वी आंध्र भागात 'पूर्व चालुक्य' किंवा वेलताटी चोळ (चोल) यांचे राज्य होते. त्यांच्यापूर्वीही महाराष्ट्र, कर्नाटक आणि आंध्र यांच्या बऱ्याचशा भू-भागांवर राष्ट्रकूटांचे राज्य होते. काही राष्ट्रकूट राजेही 'काकती' देवीचे भक्त होते. राष्ट्रकूटांपैकीच एका शाखेने 'काकतीय' असे नाव धारण करून स्वतंत्र राज्य स्थापिले असावे, अशी काही विद्वानांची समजूत आहे. हैदराबादजवळील बोइनपल्ली या गावी सापडलेल्या काकतीयांच्या एका 'कानडी शिलालेखात', 'काकादि ब्रह्म पुसि यिल्ल केरे..' अशी एक ओळ आहे.

'काकादि' पद 'काकतीय' या पदाशी संबंधित असले पाहिजे, राष्ट्रकूटांशी संबंधित असलेल्या काकर्त्य 'गुद्यान्न' याचाही काकतीय साम्राज्याच्या स्थापनेत हात आहे. काकती नावाचे एक गाव बेळगावजवळ आहे. म्हणजेच इ.स. च्या ११ व्या शतकातील कन्नड कुलापासून दूर होऊन काही लोकांनी काकतीय राज्य स्थापन केले असावे, असा अंदाज करता येतो. 'कृष्ण द्वितीय' आणि 'कृष्ण तृतीय' यांच्याबरोबर काही काकतीय शिलेदार युद्धावर जात असत. विशेषतः, वेंगीवर जेव्हा हल्ला झाला, तेव्हा राष्ट्रकूटांना काकतीय शिलेदारांनी बरीच मदत केली, असा उल्लेख आढळतो. त्यावरून सुरुवातीचे काकतीय राजे हे राष्ट्रकूटांचे सामंत असावेत, असे समजण्यास हरकत नाही, राष्ट्रकूटांचे 'वेंगी चालुक्यांशी' दीर्घकाळपर्यंत युद्ध चालू होते. काही काळानंतर 'पश्चिमी चालुक्य' प्रबळ झाले. त्यासुमारास गरुड बेतराजू याने वरंगळजवळ अनुमकोंडा येथे एक स्वतंत्र राज्य स्थापले. त्याचा मुलगा पहिला प्रोलराजू हा पराक्रमी होता. त्याने वरंगळच्या आसपासचा काही प्रदेश बळकावला. त्यावर खूश होऊन

पश्चिमी चालुक्य राजा त्रैलोक्यमल्ल याने त्याचा गौरव करून त्याला सुबेदार बनविले. इ.स. १०६८ मध्ये विक्रमादित्य चालुक्यांच्या सिंहासनावर बसला. त्याने दुसरा बेतराजू यास आणखी काही भाग देऊ केला. इ.स. ११५८ ते ११९५ या दरम्यान रुद्रदेवामुळे काकतीयांना स्वतंत्र सत्ता प्राप्त झाली. त्याच्या कारकीर्दीत अनेक मंदिरे बांधली गेली. अजूनही चांगल्या स्थितीत असलेले सहस्रस्तंभ देवालय हे त्यानेच बांधले. त्याने व त्याचा मुलगा गणपती रुद्रदेव यांनी सर्व तेलुगू भाषिक प्रदेश एकत्र आणण्याचा प्रयत्न केला. गणपती रुद्रदेवाच्या काळातच (इ.स. ११५९-१२६१) वरंगळ किल्ला बांधला गेला. 'काकतीय राज्य स्थापनाचार्य' अशी त्यांनी [illegible]र्थक पदवी मिळविली. याचवेळी नेल्लूर, वरंगळ, इत्यादी ठिकाणी अनेक चतुर विद्वानांचे वास्तव्य होते.

गणपती रुद्रदेवानंतर त्याची मुलगी रुद्रम्मादेवी राज्यावर आली, कारण गणपती रुद्रदेवाला कोणी मुलगा नव्हता. इ.स. १२६९- १२८९ या काळात तिने अनेक लढायांत भाग घेतला. तिनेच यादवराजा महादेव याला काही दिवस पकडून ठेवले होते. तिने 'रायगजकेसरी' ही पदवी धारण केली. तिला मुलगा नसल्यामुळे तिने मुम्मडियम्मा या मुलीचा मुलगा जो प्रतापरुद्र त्याला दत्तक घेतले. त्याने (इ.स. १२८९-१३२३) नेल्लूर, रायचूर, आदी प्रांत ताब्यात आणले. याच वेळी दिल्लीचा सुलतान जलालुद्दीन याच्या जावयाने इ.स. १२९६ मध्ये देवगिरीवर स्वारी केली. त्यानंतर इ.स. १३०२-१३०४ मध्ये अल्लाउद्दीन खिलजीने आंध्र राज्यावर चाल केली; पण उप्परपल्ली येथे त्याचा पराभव झाला. एक मोठे सैन्य घेऊन तो इ.स. १३०९ मध्ये पुन्हा चाल करून आला. देवगिरीचा राजा रामचंद्र याने मलिक काफूरला चढाई करण्यास मदत केली. प्रतापरुद्राने जवळ-जवळ एक महिनाभर किल्ला लढविला. पण दिल्लीच्या सैन्याने लूटमार करण्यास सुरुवात केली; तेव्हा प्रतापरुद्राने थोडेसे मिळते घेऊन मलिक काफूरशी शांततेचा तह केला. गियासुद्दीन तुगलकाचा सरदार मलुकखान याने परत हल्ला केला. त्याने वरंगळ व आसपासच्या भागांत राहणाऱ्या लोकांवर अनन्वित अत्याचार केले. त्याने प्रतापरुद्रास कैद केले. तो जेव्हा त्याला दिल्लीस घेऊन जात होता, त्या वेळी वाटेत नर्मदाकाठी प्रतापरुद्राने आत्महत्या केली. काकतीय-यादव यांचे संबंध जरी बिघडले होते, तरी विद्वानांचे येणे- जाणे चालू असावे, असे वाटते. त्याच काळात वाविलाला कुचन्न हा एक फार मोठा ज्योतिषी होऊन गेला. त्याने पंचांग-गणिताच्या काही नवीन युक्त्या शोधून काढल्या.

अशा रीतीने इ.स. च्या १३ व्या - १४ व्या शतकाच्या सुमारास महाराष्ट्र-आंध्र यांचे राजकीय संबंध जरी शत्रुत्वाचे झाले होते, तरी सामान्य प्रजेला परस्पर संबंध ठेवण्याची संधी मिळाली. देवगिरीसारख्या राजधानीच्या गावी हेमांडपंतांना प्राप्त झालेला आदर या भाषिक समन्वयाचे सुंदर निदर्शन आहे. कन्नड साहित्य व तेलुगू साहित्य याच सुमारास वेगळे होऊ

लागले होते. म्हणजे दोन्ही भाषांच्या भेदरेषा अधिकाधिक स्पष्ट होत चाललेल्या होत्या. तरीही त्या तिन्ही भाषांत काही पदे समानार्थाने घुसली गेली असावीत; याचा प्रत्यय ज्ञानेश्वरी वाचताना काही ठिकाणी येतो. त्याची काही उदाहरणे वानगीदाखल, टिपणासारखी पुढे देत आहे. त्या पदांचा आणखी सांगोपांग विचार करता येईल. अशा विचारांना प्रेरणा मिळावी, हाच या लहानशा प्रयत्नाचा उद्देश आहे. येथे काही शब्दांचा, मी आपणां सर्वांच्या विचारासाठी उल्लेख करीत आहे. अर्थात माझ्या ज्ञानाच्या (अज्ञानाच्या) मर्यादा आहेतच.

(१) '' पाहतां तुझे नि पाडे ।'' - (ज्ञाने.२.१०).
- येथे 'पाडे' याचा अर्थ 'बरोबरीने' असा आहे. त्याचा समानार्थी तेलुगू शब्द 'पाटु' हा आहे.

(२) '' तया क्षुधातृषेचा अडदरु । कांहीच नाहीं ।'' - (ज्ञाने.२.३३९).
- 'अडदरु' यासारखा 'अड्डदारि' हा तेलुगू शब्द आहे. 'अड्ड+दारि' असे ते सामासिक पद आहे. अड्ड = आडवा, वाकडा. दारि = वाट, मार्ग. 'अड्डदारि' म्हणजे आडमार्ग, अडचणीचा मार्ग. प्रस्तुत ओळीत या शब्दाचा अर्थ 'अडथळा', 'अडचण' असा आहे.

(३) **'लेखणी' :** 'लेखणी' या पदाचा अर्थ 'लिहिण्याचे साधन' असा आहे. पण ज्ञानेश्वरीत एके ठिकाणी (ज्ञाने. २.३६५) 'गणना, किंमत' अशा अर्थाने तो शब्द आलेला आहे:-
-''पार्था नवल हे पाही । जेथे स्वर्गसुखा लेखणी नाही ।
तेथ ऋद्धिसिद्धि कायी । प्राकृत होती ।।'' - (ज्ञाने. २.३६५).
'लेखणी', कदाचित 'लेक्क' या तेलुगू शब्दाचे स्मरण करून देते. तेलुगू भाषेत त्या शब्दाचा अर्थ, 'किंमत, गणना' असाच आहे. हा शब्दही प्रवास करीत महाराष्ट्रात आला असावा.

(४) **'मातु' :** 'मातु'=गोष्ट. या अर्थाचा 'माटा' शब्द तेलुगूत आहे. ज्ञानेश्वरीत तो पुढील प्रमाणे आलेला आहे :

१. ''तो आइकेजि बहुता काळांचा । आणि तू तव श्रीकृष्ण सांपेंचा ।
म्हणोनि गा इये मातूचा । विसंवादु ।।'' - (ज्ञाने.४.१३०).

२. '' परि हेचि मातु अवघी । मी परियसे ऐसी सांगावी ।।'' - (ज्ञाने.४.४०)

(५) **'मसैरे' :** 'मसैरे' हा शब्द 'मसी' किंवा 'मशी' या पदापासून विशेषण म्हणून आला असावा. 'मसी' याचा, संस्कृतात अर्थ आहे: शाई, काळेपण, काळोख. अर्थात काळा डाग, किल्मिष या अर्थाने ज्ञानेश्वरीत या शब्दाचा प्रयोग दिसून येतो : ''तै अज्ञान जे समूळ तुटे । ते भ्रांतीचे मसैरे फिटे ।।'' असा हा शब्द मराठीत इतरत्र आला आहे, की काय, याचा

शोध घ्यावयास पाहिजे.

(६) **'नेटे' :** अ) 'नेटे' = दाब, दाबणे.

-''माजि अंगुळ एक निगे । तेथ टाचेचेनि उत्तर मागे ।
नेटेटि जे करि अंगे । पेललेनि ।।'' - (ज्ञाने. ६.१९६).

या ठिकाणी 'नेटे' चा अर्थ 'दाबून' असा दिलेला आढळतो. (संदर्भ : साखरेमहाराज-प्रत) 'नेट्टुटा' हा धातू याच अर्थाने तेलुगू भाषेत आहे. 'नेहटे' असाही एक पर्यायी शब्द 'ज्ञा. .री' त आला आहे:

आ) ''मग कंठनाळ आटे । हनुवटी हडौती दाटे ।
ते गाढी होऊनि नेहटे । वक्षःस्थळी ।।'' (ज्ञाने. ६.२०७).

(७) **'पंधरेयाचि' :**

''विद्युल्लतेची विडी । वन्हिज्वाळांची घडी ।
पंधरेयाचि चोखडी । घोटीव जैसी ।।'' (ज्ञाने. ६.२२४).

'पंधरे' याचा अर्थ 'सोने' असा आहे. प्राकृत-संस्कृत कोठल्याही भाषेत तत्सदृश शब्द नाही. पण कन्नड-तेलुगूमध्ये तदर्थी शब्द सर्वत्र वापरला जातो; बंगारमू, बंजारू. त्यामुळे या शब्दाची या दक्षिणी शब्दाशी जवळीक आहे, हे सिद्ध होते.

(८) **'बोनी' किंवा 'बोने' :** हा शब्द 'जेवण' अशा अर्थी ज्ञानेश्वरांनी वापरला आहे. हा 'भोजन' या संस्कृत शब्दाची विकृती आहे; हे उघड आहे. पण त्या अर्थाने तो मराठीत फारसा वापरला जात नाही. मात्र 'भोजन', 'भोज' ही व्युत्पत्ती प्रचलित तेलुगू भाषेत आहे. 'बोनी' किंवा 'बोन' (अनेकवचन-'बोनालु') हा शब्द निम्नस्तरीय तेलुगू भाषेत येतो. 'बोनालु' याचा अर्थ 'नैवेद्य दाखविणे, देव-देवींच्या नावाने जेवणावळ करणे' अशा अर्थाने तो अजूनही वापरला जातो. ज्ञानेश्वरीतही याच अर्थाने तो शब्द आलेला आहे :

१. '' बुद्धीचेनि शाके। हातबोने निके।
द्वैत तेथ न देखे। तैसे केले।। '' - (ज्ञाने. ६.२८२).

२. '' मज अमृताहूनि सुरसे ।
बोनी वोगरिली सुरसे ।।'' - (ज्ञाने. ९.३९३).

(९) **'नोकुट' :** हा धातू 'दूर करणे', 'चेपून टकणे' या अर्थाने तेलुगू भाषेत प्रसिद्ध आहे. ज्ञानेश्वरीत त्या अर्थाने तो शब्द आला आहे :

१. "देखोनि नासिकी नोकिली । भक्तवृंदे ।।" - (ज्ञाने. ६.३२४).
२. "कलिकाळ नोकोनिया । घेतला पट्टा ।।" - (ज्ञाने.१२.८४).

(१०) **'येरी','येरु'** : हा शब्द ज्ञानेश्वरीत, तसेच प्राचीन मराठी साहित्यात बऱ्याच वेळा आला आहे; 'अन्य', 'दुसरा', 'निराळा' अशा अर्थानेे तो येतोः
" येरी (इतर व्यक्ती) जीवाभावाचिये पालविये ।" - (ज्ञाने. ८.२७).

(११) **'वोरबाटा'** : हा शब्द ज्ञानेश्वरीत, 'खटपट','प्रयत्न', 'व्यवस्था करणे' या अर्थी आला आहे. त्याच अर्थाने थोडासा निराळा शब्द, 'येरपाटु' तेलुगू भाषेत रूढ आहे. - "स्वप्नाचिया वोरबाटा । संतोषे शिणे ।। " - (ज्ञाने.८.३५).

(१२) **'वोलिवटा'** : 'वाहती वाट, रूढ मार्ग, रुळून गेलेला रस्ता, जाण्याची वाट', अशा अर्थाने ज्ञानेश्वरीत हा शब्द आलेला आहे :-
" जे काळाचा खिन्न उशिटा । जे आशेचा अंगवठा ।
जन्ममरणाचा वोलिवटा । स्वभावे जे ।। " - (ज्ञाने. ८.१४४). याच रूपाचा तेलुगू शब्द 'वेल्लुबाटा' आहे.

(१३) **'वेऱ्ही'** : 'पर्यंत' या अर्थाने 'वेऱ्ही' हा शब्द ज्ञानेश्वरीत आला आहे. संस्कृत-प्राकृतमध्ये तशा तऱ्हेचा शब्द नाही. पण दक्षिणेतील भागात तशा तऱ्हेचा शब्द येतो. उदाहरणार्थ, वरै (तामिळ), वरळु (तेलुगू) ज्ञानेश्वरीतील ओळी अशा आहेतः
१. "ऐसा सावध हा समवावो । आणि निर्वाणवेऱ्ही निर्वाहो ।
हे तरीच घडे सावावो । अग्नीचा आथी ।।" - (ज्ञाने. ८.२११).
२. "परि साचचि महामोहाचिये पुरी । बुडिलिया देखोनि सरुवरी ।।" - (ज्ञाने. ११.४८).

(१४) **'तुक' किंवा 'तूक'** : 'वजन करणे' अशा अर्थाने तेलुगू भाषेत हा शब्द वापरला जातो. या अर्थाने तो ज्ञानेश्वरीतही आला आहे. संस्कृत वा प्राकृतमध्ये तादृश शब्द नाही. ज्ञानेश्वरीतील तत्संबंधीची ओवी अशी आहे :
"तेवि भेदबुद्धीचिये तुळे । घालूनि सूर्यश्लेषाचे कांटाळे ।
तुकिलासि ते येके वेळे । उपसाहिजो जी ।। - (ज्ञाने. १६.२८).
(१५) **'का उबारेने वज्र फेडिले ।'** : तेलुगुमध्ये 'उब्बरि' असा शब्द आहे.
(१६) **'प्रबंध'** : " ते वोवियेचेनि प्रबंधे । सांगेन मी ।" - (ज्ञाने. ४-४९७).

(प्रबंध = कविता, काव्यरचना.)

(१७) **'आतुळावी'** : (पेटविणे)

'आतुळावी पंचाग्नीची दडगी । खोलवीजती शरीरालागी ।
कां इंधन कीजे हे आगी । आतुळावी ।'' -(ज्ञाने. १७-२५५)

- 'अंटुरा' असा याच अर्थाचा तेलुगु धातू आहे.

सामान्य वाचनात मला वरील शब्द दिसून आले. ज्या शब्दांची व्युत्पत्ती रूढियोगाने लावता येत नाही, त्यांची व्युत्पत्ती लावण्यासाठी दक्षिणेतील भाषांशी संबंध साधता येतो, ही एक नम्र सूचना विद्वानांना करावी, हा माझा नियत हेतू आहे. अर्थात ही पद्धती परोक्ष आहे, आणि पारिशेब्द-न्यायावर आधारली आहे, याची मला कल्पना आहे. ज्ञानेश्वरीच्या शब्दसृष्टीचा ठाव घेण्यास १३ व्या शतकातील मराठी-तेलुगू या भाषांच्या स्थितींच्या अधिक गंभीर अध्ययनाची आवश्यकता आहे.

'मराठी द्राविडी संबंध व ज्ञानेश्वरीतील द्राविडी संबंध' या आपल्या लेखात ('विविध ज्ञान विस्तार', नोव्हें-डिसें. १९३४, पृ. २३७ ते २४१) - ''चारच शब्द ज्ञानेश्वरीत तेलुगूतून आले,'' असे म्हटलेले आहे.

१. 'बुरी' (ज्ञाने. १३.५५७), तेलुगु 'बुरूड' पासून;

२ व ३. 'उबास' (ज्ञाने. ८.६५), तेलुगु 'उब्ब', 'उब्बरि' पासून;

४. 'येकवंकी' (ज्ञाने.४.१२), ('एकरूपी' हा अर्थ), तेलुगु 'वंकबंकी' पासून आले असावेत(?) असे त्या लेखात म्हटलेले आहे. पण ते सर्व शब्द वादापलिकडचे नाहीत, तेलुगू शब्द कानडीच्याद्वारे मराठीत आले, यात काहीसे तथ्य आहे; पण ते संपूर्ण तथ्य नव्हे. प्रा. चिं. नी. जोशी यांनी अशा ६७ कानडी शब्दांची यादी दिली आहे. प्रा. गुजराती यांनीही 'ज्ञानेश्वरीतील शब्दसंपत्ती' या प्रबंधात असे २३० शब्द दिले आहेत.

'सुरवाडे', 'कडसण', 'अव्हांटलिया' अशा शब्दांच्या व्युत्पत्तीचा पुनर्विचार व्हावा.

अर्थात, थोडया शब्दांवरून, ''ज्ञानेश्वरीने द्राविडी भाषांतून बरेच शब्द घेतले आहेत,'' असे म्हणणे बरोबर ठरणार नाही, पण काही शब्दांचे मूळ, मराठीपेक्षा प्राचीन असलेल्या तेलुगू भाषेत दाखविता येईल, किंबहुना तशी शक्यता आहे; हा विचार आपल्यापुढे मांडावा, एवढाच या लघुलेखाचा लघुतर उद्देश आहे.

**(गीताधर्म मंडळ, पुणे ३० च्या एका सभेत वाचला गेलेला लेख.)**

**५, कमलापार्क, नारायणी हॉस्पिटलजवळ, एरंडवणे, पुणे ४११०३८**

# कल्पना-स्फोट : म्हटलं, तर एक खेळ; म्हटलं, तर एक तंत्र

सुहास मेहेंदळे

तर्कबद्ध राहणे, तपशिलाला महत्त्व देणे, गणिती असणे, तुलना करणे, गुणदोष तपासणे, योग्य-अयोग्य ठरवणे, व्यावहारिक-आर्थिक दृष्टी केंद्रस्थानी ठेवणे अशा प्रकारच्या प्रक्रियांना जीवनात अत्यंत महत्त्वाचे स्थान दिले जाते आणि त्यात अध्ययन-अध्यापन-संशोधन करण्याचे बरे-वाईट प्रयत्न सतत चाललेले असतात. पण कल्पना / मुद्दे सुचणे, नवीन आगळे-वेगळे स्फुरणे, मुक्त असणे, विस्काळीततेतही आनंद घेणे, नवनिर्माण करणे, कलेची ओढ असणे, यांसारख्या प्रक्रियांना तुलनेने कोणतेही महत्त्व दिले जात नाही. त्यांचे संशोधन तर दूरच.[१] जीवनाच्या या अंगाचा 'भाषेच्या दृष्टीने विचार' जवळपास होतच नाही. यासाठीच, काही व्यक्ती व संस्था यांनी 'सुचण्याची प्रक्रिया' या बाबतीत केलेल्या प्रयोगांच्या आधारे एक टिपण येथे सादर केले आहे.[२]

एखादी नवी कल्पना आपल्याला सुचली, की काय होते ?
परदेशातील आपल्या प्रिय व्यक्तीला भेटण्याची तीव्र इच्छा झाली आणि कल्पना सुचली,की मनोवेगाने उडत तिच्याकडे जावे. ही कल्पना सुचल्याबरोबर काय होतं ? मनात विचार येतो, की हॅऽऽ ! हे कसं शक्य आहे? इतरांना ही कल्पना सांगितली, तर ते लगेचच म्हणतील, एवढया मोठ्या या ढोक्याला उडता येणं तर सोडाच, पण उडी तरी मारता येईल का ? 'लोक

..............................

(१) " मेंदूच्या डाव्या व उजव्या गोलार्धांची कार्ये स्वतंत्र असतात. यापैकी तर्कबध्द राहणे, आर्थिक दृष्टी केंद्रस्थानी ठेवणे ..... ही कार्ये डाव्या मेंदूची, तर कल्पना मुद्दे सुचणे, कलेची ओढ असणे अशी कार्ये उजव्या मेंदूची असतात. आणि सामान्यतः एकाच गोलार्धाचा वापर मोठया प्रमाणावर करण्याची सवय आपल्याला लागलेली असते. त्यामुळे विकास खुरटतो. हे टाळण्यासाठी दोन्ही गोलार्धांचा संतुलित वापर करण्याचे प्रशिक्षण देणे आवश्यक आहे, येथे केलेली तक्रार या मोठया तक्रारीचा एक भाग आहे.

(२) डॉ. अशोक निरफराके, डॉ. उल्हास लुकतुके, डॉ. सुहास मेहेंदळे, सौ. मंदाकिनी नगरकर, सौ. वनिता पटवर्धन, सौ. आशा नातू यांनी व्यक्तिगत व संस्थात्मक (ज्ञानप्रबोधिनी, ए.पी.ए.आय् (पुणे शाखा) जिज्ञासा संघटना, लिओ क्लब), पातळीवर केलेल्या प्रयोगांचा आधार येथे घेतला आहे.

काय म्हणतील', 'काय हा पोरकटपणा', असे विचार आले, की सुचलेली कल्पना टाकाऊ, क्षुल्लक वाटते, नव्या कल्पना सुचणंच थांबतं आणि आपण पुन्हा 'यशस्वी व्यवहारी' बनतो.

याचा अर्थ असा, की 'सुचणं' आणि 'व्यावहारिक विचार करणं' या केवळ परस्परविरोधी नसतात, तर विचारांचा प्रभाव कल्पना सुचण्याला मारक ठरतो, सुचलेल्या कल्पना रद्दीत काढतो, 'सुचविण्याची प्रक्रियाही थांबवतो. कल्पना सुचाव्यात, असं वाटत असेल, तर 'विचार' करणं टीकाटिप्पणी करणं - तुलना करणं- योग्य-अयोग्य ठरवणं - कारणमीमांसा देणं - व्यवहार पाहणं - काही काळापुरतं तरी - थांबवणं आवश्यक आहे. अर्थात 'सुचण्याची प्रक्रिया' परिमाणकारक होण्यासाठी पहिला नियम असा, की 'टीका-टिप्पणी बंद'.

आणखी एक गंमत होते. एखादी कल्पना सुचली, की त्या पहिला - वहिल्या कल्पनेच्या आपण प्रेमात पडतो. 'रडणाऱ्या मुलाला गप्प कसं करावं' यासाठी, समजा, अशी कल्पना सुचली, की 'त्याला खाऊ द्यावा'. की मग मात्र आपण याच कल्पनेत अडकतो आणि आंबा द्यावा, पेरू द्यावा, गोड-धोड द्यावे, चॉकोलेट द्यावे, असा या एकाच कल्पनेचा विस्तार करतो, म्हणून कल्पना चाकोरीबाहय हवी, नवी हवी - क्वचित हास्यास्पद असली, तरी चालेल - मौलिक हवी. संदर्भ बदलून, भिन्न क्षेत्रं एकत्र करून, 'नवी कल्पना' सुचू शकते. 'कापसाच्या झाडाला आंब्याबरोबरच संगणक आपोआप यावेत' अशी कल्पना एक नवी दिशा देते व अनेक जण जर एकत्र असतील, तर उत्साहाचे एक वेगळेच वातावरण बनते. एकीतून दुसरी, दुसरीतून तिसरी, अशा प्रकारे संदर्भ बदलत, वेगवेगळी क्षेत्रे निवडत निवडत, नव्या कल्पना सुचू लागतात. सुचण्याला चालना देणारा 'नव्या -भन्नाट-कल्पनांचे स्वागत' हा दुसरा नियम यातून निष्पन्न होतो.

काही व्यक्ती 'सुचण्याचा' खेळ एकत्रित बसून करतात, तेव्हा बाह्य प्रेरक मदत करू शकतात. म्हणजे वेळेचे बंधन घातले आणि संख्यात्मक उद्दिष्ट ठरवले, तर 'कल्पना सुचण्याची जणू स्पर्धाच' लागते. विचार-टीका-करण्याचे थांबते आणि कल्पनेमागून कल्पना सुचू लागतात. 'पाच मिनिटांत तीस कल्पना सुचल्याच पाहिजेत', असे हे बंधन असेल. हेच 'ब्रेन स्टॉर्मिंग' तंत्र. मराठीत याला 'कल्पनास्फोट' हे नाव रूढ होत आहे.[३]

एकामागून एक कल्पना सुचाव्यात यासाठी 'भाषा' अभ्यास फार उपयुक्त ठरतो. विरोधी शब्द, पर्यायी शब्द, म्हणी, वाक्प्रचार, इत्यादी विविध 'शब्द-संग्रह-समृद्धी' नव्या कल्पना एकत्रित करण्यासाठी प्रेरक ठरतात. या खेळात एक संयोजक असेल, तर चांगले. तो सर्वांना

..................................

(३) 'ब्रेनस्टॉर्मिंग ही संज्ञा 'कारणांना' महत्त्व देऊन बनविली आहे. तर 'कल्पनास्फोट' ही संज्ञा 'परिणामांवर - कल्पनांच्या निर्मितीवर'- भर देऊन तयार केली आहे. 'कल्पना स्फोट' हे नामकरण डॉ. अशोक निरफराके यांनी केले. 'ब्रेनस्टॉर्मिंग' ही संज्ञा व गोष्ट १९५५ च्या सुमाराला प्रचलित झाल्या.

सुचलेल्या कल्पनांची नोंद ठेवतो, खेळाचे नियम पाळले जात नसल्यास, त्यांची आठवण करून देतो व प्रोत्साहक या नात्याने खेळावर नियंत्रण ठेवतो.

कल्पना स्फोटासाठी विषय कोणतेही असतात. एका शिबिरात रोज नियमितपणे हा खेळ घेतला, त्याचे विषय व पाच मिनिटांत सुचलेल्या कल्पनांची संख्या अशी : वैद्यकीय निदानतंत्रांची प्रगती (५ मिनिटे - ४० कल्पना), अंतर्गत सजावट (४३ कल्पना), कविता (५६ कल्पना), घरबांधणी (५१ कल्पना), एसूटी व्यवहार (३६ कल्पना), 'अभिनय व जीवन', 'पाणी व जीवन', 'तारांगण,' 'धरणाचे प्रश्न', 'उद्योगसमूह', साहित्य व संशोधन, कवितांचे अध्यापन, असे हे आणखी काही विषय आहेत. कोणत्याही विषयावर 'कल्पना स्फोट' घेता येतो, हे यावरून स्पष्ट होईल.

कल्पना सुचण्यासाठी प्रेरक म्हणून 'प्रश्न विचारा', 'विरोध करा', 'व्याप्ती वाढवा', 'तादात्म्य पावा', 'संयोग करा', 'क्षेत्रे बदला', अशा सूचना उपयुक्त ठरतात. साहित्य-संशोधन-प्रक्रिया या विषयावरच्या एम्.फिल; पीएच्.डी. च्या विद्यार्थी-मार्गदर्शकांच्या कृतिसत्रात घेतलेल्या कल्पना स्फोटातून सुचलेल्या 'कल्पनांची सूची' लेखाच्या शेवटी दिली आहे. एका विषयाच्या कल्पना सुचण्यासाठी पाच मिनिटे पुरली नाहीत, म्हणून आणखी पाच मिनिटे वेळ वाढवावा लागला. या कल्पनांवरून खूप कल्पना सुचू शकतात, हे पटू शकेल.

एकदा कल्पना सुचण्याचे काम संपले, की मग सुचलेल्या कल्पनांचे परीक्षण, समीक्षण करता येते. काही कल्पना पुनरुक्त झालेल्या असतात, त्या वगळता येतात. अव्यवहार्य कल्पना सोडून देता येतात. मग त्यांतून नव्या, उपयुक्त कल्पनांचा वापर करता येतो. नव्या कल्पना-नवीन दिशा सुचणे, हा या खेळाचा महत्त्वाचा लाभ आहे.[४]

................................

(४) या खेळाचे थोडक्यात स्वरूप असे :

८ ते १० जणांपासून ते ३० ते ४० जणांच्या गटात कल्पनास्फोट घेता येतो. त्यांतील एक जण संयोजकाचे काम करतो व बाकी खेळाडू कल्पना सुचवतात. संयोजक प्रथम १) टीका टिप्पणी बंद २) नव्या कल्पनांचे स्वागत ३) संख्यात्मक उद्दिष्ट व ४) वेळेचे बंधन हे नियम समजावून सांगतो. व कल्पनास्फोटासाठी एखादा विषय देतो. नंतर खेळातील प्रत्येक सहभागी व्यक्ती तिला सुचेत ती कल्पना सांगते व संयोजक ती प्रत्येक कल्पना फळयावर लिहितो. खेळाचे नियम पाळले जात आहेत, हे संयोजक पाहतो व त्यांची योग्य ठिकाणी जाणीव करून देतो. नव्या कल्पनांसाठी सहभाग्यांना उत्तेजन देणे, विषयाच्या भिन्न बाजू लक्षात जाणून देणे, वेळेची जाणीव वारंवार करून देणे, प्रत्येक जणाने भाग घ्यावा, यासाठी प्रत्येकाला बोलते करणे, उत्साही वातावरण ठेवणे, ही त्याची प्रमुख कामे आहेत. वेळ संपली, की फळयावरील कल्पनांचे विश्लेषण करता येते.

हा खेळ एकट्यालाही खेळता येतो. संयोजकांची कामे अर्थातच स्वतःलाच करावी लागतात.

आपल्याला सहज सुचणारे मुद्दे / कल्पना महत्त्वाच्या आहेत. त्यांचा उपयोग आहे. आपल्यालाही सुचू शकते. हे लक्षात आले, की स्वाभाविकच आत्मविश्वास वाढतो. सुचलेली कल्पना सगळ्यांच्या देखत सांगितल्यामुळे बोलण्याचा सराव होतो. 'सुचण्याची' व 'विचार करण्याची' या दोन्ही प्रक्रिया वेगळ्या आहेत; व हवी तेव्हा, हवी ती प्रक्रिया आपण वापरू शकतो, याचा अनुभव कळत-नकळत येतो. या सगळ्यांमुळे भाग घेणाऱ्यांचा 'आत्मसन्मान' वाढतो.

काही वेळा प्रशिक्षणार्थी विद्यार्थी यांना नेमकं काय हवं आहे, एखाद्या विषयाबाबत त्यांना कोणती माहिती आहे, याचा अंदाज येत नाही. विद्यार्थी अनोळखी असतात, शिबिरे एक-दोन दिवसांची असतात, त्यामुळे विद्यार्थ्यांचे पूर्व-ज्ञान व त्यांच्या 'गरजा' ओळखण्यासाठी पुरेसा अवधी मिळत नाही. अशा वेळी 'कल्पनास्फोट' उपयोगी पडतो. एखादा विषय सरावासाठी घेऊन, नंतर लगेचच संबंधित विषय घेतला, की काम भागते. सुचलेले मुद्दे उत्स्फूर्तनेते सांगायचे असल्याने, पूर्वज्ञान व गरजा, न कळत बाहेर येतात. एरवी विद्यार्थ्यांनी या प्रकल्पातून 'मला हे हवं आहे', असं सांगितलं, तरी तो समजून सांगत असेल, असे नाही. शिवाय जाणीवपूर्वक मांडत असल्याने त्या गरजा कृत्रिम असण्याची शक्यता असते. वय लहान असेल, तर सांगणेही अवघड जात असते. कल्पनास्फोटाने या अडचणी काही प्रमाणात दूर होतात व प्रशिक्षणात, शिकणाऱ्याला धीटपणा, 'असर्टिव्हनेस्' येतो. एकदा हा पूर्वानुभव कळाला, की नवीन माहिती, ज्ञान, कौशल्ये यांच्याशी त्यांची सांगड घालणे सोपे जाते.

सगळयांत महत्त्वाच्या लाभ, सर्वांचा 'सहभाग' वाढतो. या शिक्षणात 'शिकवणारा' व 'शिकणारा' यांतील दुरावा पुसला जातो. जवळीक वाढते विद्यार्थी मोकळे होतात. उत्साहाचे वातावरण निर्माण होते. अभ्यासात, शिकण्यात आनंद आहे, याची प्रचीती येते. कल्पनाकौशल्ये स्फोटाच्या जोडीला प्रश्नतंत्र (एन्क्वायरी टेक्निक) निरीक्षण तंत्र (ऑब्झर्वेशन टेक्निक) यांची जोड दिली, तर त्यांचा उपयोग शिक्षणाप्रमाणे व्यक्तिगत, दैनंदिन जीवनातही होऊ शकतो. एखाद्या समस्येकडे पाहण्याचे विविध दृष्टिकोन कळू शकतात. एकांगीपणा टळतो, वस्तुनिष्ठ बनण्यास मदत होते. उत्स्फूर्तता व विश्लेषकवृत्ती यांची सांगड घातली जाते. समस्या सोडवण्यास मदत होते. जीवनाचा सर्वांगीण आनंद घेण्याची क्षमता विकसित होते. हा खेळ सवयीने एकालाही खेळता येतो आणि केव्हाही, कोठेही उपयुक्त ठरू शकतो. भाषणाचे मुद्दे, निबंधाचे विषय, मुद्दे, नवी उत्तरे, समस्यांची सोडवणूक अशा अनेक प्रसंगी 'कल्पनास्फोट' वापरता येतो. एकट्याने खेळून किंवा एखाद्या गटात हा खेळ घेऊन याची प्रचीती पाहावी व आपले अनुभव अवश्य कळवावेत.

## परिशिष्ट :

**कल्पनास्फोट**
**विषय : साहित्य-संशोधन**
**वेळ : ५ मिनिटे**
**अपेक्षित संख्या ४०**

१. संशोधन का पाहिजे ?
२. संशोधन कशासाठी ?
३. संशोधन कशावर ?
४. संशोधन कोण करणार ?
५. साहित्याचा प्रकार
६. उपयोग
७. संशोधन कोणासाठी ?
८. आधार कोणता ?
९. तत्त्वे कोणती ?
१०. काय करणार ?
११. किती समजते ?
१२. बीज ग्रंथ
१३. गृहीत तत्त्वे कोणती ?
१४. संशोधन-पद्धती
१५. संशोधन-प्रकार
१६. नवीन काय ?
१७. गृहीत काय ?
१८. फायदा काय ?
१९. मार्गदर्शक - नकोत
२०. अपेक्षा
२१. उद्दिष्टे
२२. साहित्य-प्रकार
२३. कथा, कादंबरी
२४. लोकसाहित्य
२५. विविध 'भाव'

**कल्पनास्फोट**
**विषय : साहित्य-संशोधन**
**वेळ : ५ मिनिटे**
**अपेक्षित संख्या : ४०**

१. विचार, तर्क, स्पष्टता
२. आवडीचा विषय
३. मौखिक प्रकार (प्रवचन)
४. अनेक आधार-ग्रंथ
५. काळाची सामाजिकता
६. सार्वत्रिकता पाहिजे
७. सुस्पष्टता
८. स्पष्टीकरण
९. भावनात्मक विचार
१०. मर्यादा
११. अवतरणे
१२. व्हीडिओ, ऑडिओ
१३. बंधन नको
१४. आदर्श मार्गदर्शक नमुना
१५. प्रायोगिक
१६. भाषांतर करता आले पाहिजे
१७. तुलनात्मक अभ्यास
१८. प्रकार
१९. अन्य क्षेत्रांतील पध्दती
२०. विविध विषयांचा समन्वय
२१. उपयोगिता
२२.नवे आधार / संदर्भ
२३. समाजावर परिणाम
२४. साहित्य - समाज संबंध
२५. उपयुक्तता



अनुक्रमणिका

२६. तुलना - साम्य
२७. स्वतंत्र बुद्धी
२८. इतर वाङ्‌मय-प्रकार
२९. संशोधक गुण
३०. परिश्रम
३१. पूर्वानुभव
३२. आधुनिक साधने
३३. पूर्वगृहीत नसावे
३४. दोष टाळावेत
३५. मार्गदर्शन क्षमता तपासावी
३६. मते लादू नयेत
३७. संशोधनाचा कणा ओळखावा
३८. सत्यवेधी संशोधन
३९. इतिहासाचे ज्ञान
४०. निष्कर्ष काढावेत
४१. प्रबंध लिहिणे
४२. कारण-पध्दती
४३. पद्यातून लिहिणे
४४. तपासणी आवश्यक

२६. समन्वयाची दृष्टी
२७. आधार / संदर्भ
२८. जीवन समृद्ध व्हावे
२९. लेखन-पद्धती
३०. आत्मविश्वास वाढावा
३१. मुक्तता
३२. वैचारिक परिणाम
३३. आदर्श
३४. भौतिकता
३५. रसिकता
३६. व्यक्तिमत्त्वाचा शोध
३७. शब्दांवरून व्यक्तिमत्त्व
३८. उच्चार-पद्धती
३९. तार्किकता
४०. निर्भीडता
४१. संशोधन पाहिजे का ?
४२. संशोधन कशासाठी ?

**कल्पनास्फोट**
**विषय-रडणाऱ्या मुलाला गप्प कसे कराल?**
**वेळ - ५ मिनिटे**
**संख्या - २५**

०१. चिमण्या-कावळे दाखविणे.
०२. खाऊ देणे
०३. खेळणी देणे
०४. गाणी म्हणणे
०५. नाचणे
०६. झुलवणे

**कल्पनास्फोट**
**विषय - खुर्चीत सुधारणा**
**वेळ - ५ मिनिटे**
**संख्या - ६०**

१. गोल फिरली पाहिजे
२. रेलणे, टेकणे आले पाहिजे
३. उंची कमी / जास्त
४. हात असणे
५. वजन पेलणे
६. स्पंज लावणे

०७. फिरायला नेणे
०८. झूल्यात बसविणे
०९. ध्वनी काढणे
१०. चुटकी वाजविणे
११. समजून घेणे
१२. चॉकलेट देणे
१३. दोन थोबाडीत देणे
१४. रागावणे
१५. मित्र-मैत्रिणींकडे नेणे
१६. खेळायला नेणे
१७. वाहनावर बसविणे
१८. चित्र दाखविणे
१९. गोष्ट सांगणे
२०. पाळण्यात बसविणे
२१. पाण्यात बसविणे
२२. आवडती वस्तू देणे
२३. पाने - फुले दाखविणे
२४. भीती दाखविणे
२५. उंच उडविणे
२६. आपण रडणे
२७. आईजवळ देणे
२८. वडिलांजवळ देणे
२९. अंगाईगीत गाणे
३०. पदराखाली घेणे (दूध पाजण्यासाठी)
३१. आवडती गोष्ट सांगणे
३२. कुत्रा दाखविणे
३३. कारण विचारणे
३४. नकला करून दाखविणे
३५. प्राण्यांचे आवाज काढणे
३६. परीची गोष्ट सांगणे
३७. रेडिओ, टी.व्ही. दाखविणे
३८. दुसऱ्याला खोटे मारणे

७. हात
८. पाय काढणे
९. सरकवता येणे
१०. चाके लावणे
११. पायाला बूच बसविणे
१२. उंची वाढवता आली पाहिजे
१३. डोक्याला स्पंज
१४. पाय पसरवता आले पाहिजेत
१५. हात, दुप्पट करून पाय ठेवणे
१६. पाय पसरवून बसणे
१७. लिहिता यायला पाहिजे
१८. वेग, खुर्चीसकट कोठेही जाणे
१९. झोपण्यासाठी सोय पाहिजे
२०. झोपाळ्यासारखी पाहिजे
२१. मान टेकवता आली पाहिजे
२२. आकर्षक पाहिजे.
२३. सुंदर पाहिजे
२४. डिझाईन पाहिजे
२५. सुवासिक असावी
२६. खाता, पिता यायला पाहिजे
२७. थाळी ठेवता यायला पाहिजे
२८. कोरीव काम पाहिजे
२९. छत्र पाहिजे
३०. मान देणारी पाहिजे
३१. मंत्र्यासारखी पाहिजे
३२. स्पंज असावेत
३३. डिझाईन बदलावे
३४. चांगली भावना सुचविणारी
३५. कप्पे पाहिजेत
३६. रंग, डिझाईन नवे
३७. किंमत कमी
३८. पैशाचा पाऊस पाडणारी
३९. ॲश-ट्रे हवा

४०. ब्रेक असावेत
४१. पंख असावेत
४२. नियंत्रण करता यावे
४३. जादूची खुर्ची : हवे ते द्यावे

**शैक्षणिक विभाग, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, कॉलेज रस्ता, नाशिक ४२२००५**

## पुरवणी :

'पण हा लेख कुठं तरी अपुरा आहे, असं जाणवतंय,' असे पत्र मला लिहून संपादकांनी नऊ प्रश्न उपस्थित केले आहेत आणि या सर्वांचा परामर्श घेणारा 'पुरवणीवजा लेख' द्यावा, अशी सूचना केली आहे. तूर्त हे प्रश्न व त्यांबाबतचे काही स्पष्टीकरण पुरवणी म्हणून देत आहे.

**प्रश्न :** 'कल्पनास्फोट' हा खेळ केवळ अध्यापनतंत्र म्हणून म्हणून खेळायला ठीक वाटतो. पण सामूहिक रीत्या खेळण्याजोगी रंजकता त्यात किती असेल?'

कल्पनास्फोट हा शैक्षणिक खेळ आहे. अध्ययन-अध्यापन यांबरोबरच रोजच्या जीवनात आपण जे जे शिकत शिकवत असतो, या सगळ्यांचाच समावेश शिक्षण या संज्ञेत अभिप्रेत आहे. कौटुंबिक, सामाजिक, राजकीय अशा कोणत्याही स्तरावर कोठेही याचा कुशल वापर करता येईल. 'सेवानिवृत्ती घ्यावी की नाही', 'बदलीचे सामान केव्हा व कसे हलवावे', असे प्रश्नही चार जणांच्या कुटुंबात 'कल्पनास्फोट' या तंत्राने, खेळाने एकत्र बसून सोडवता येतात. अर्थात या प्रक्रियेत चारही जणांना समान वाव हवा. सामूहिकरीत्या खेळताना मोकळीक व जवळीक वाढते. नव्या अनपेक्षित कल्पनांनी गंमत वाढते व उत्साही वातावरण निर्माण होते. सहभाग वाढतो, परिणामी खेळ रंगतो. अर्थात स्वतः खेळून किंवा खेळाचे निरीक्षण करून तो अनुभवायला हवा.

**प्रश्न :** एकदा एका कल्पनेभोवती खेळल्यावर तो दीर्घकाळ खेळता येईल का?

या खेळात एका वेळी एक विषय निवडायचा असतो आणि ५ मिनिटांत त्यावर अनेक कल्पना सुचवायच्या असतात. अगदी थोड्या वेळात अनेक मुद्दे ऐनवेळा सुचणे, हे याचे वैशिष्ट्य आहे. त्यामुळे विषय वेगवेगळे, सहभागी व्यक्ती निरनिराळ्या, त्यांचे उद्देश व अनुभवक्षेत्र भिन्न व सहजवृत्तीला वाव यांमुळे 'उत्साही' व मोकळे वातावरण म्हणून आवश्यकतेनुसार हे तंत्र कितीही वेळा वापरता येते. याचा अर्थ, एका विषयावर हा कल्पनास्फोट ५ मिनिटे चालेल, पण हे तंत्र मात्र दीर्घकाळ वापरता येते.

**प्रश्न :** एका व्यक्तीच्या कल्पना-साम्राज्यात दुसऱ्या व्यक्तीला किती रस असेल?

प्रत्येकाचे कल्पनासाम्राज्य हे व्यक्तीचे खासगी असते. त्यात दुसऱ्याला रस असो वा नसो, या साम्राज्याचा कल्पनास्फोटात काही संबंध येत नाही. जाणीव-नेणिवेच्या सीमारेषेवर





अनुक्रमणिका

असलेल्या, पूर्वी घेतलेल्या भाव-विचार-विश्वातून एखाद्या विषयाच्या बाबतीत आपल्या ज्या प्रतिक्रिया उमटतात, त्यांचाच आविष्कार कल्पनास्फोटात – विचारांची बंधने घातल्यामुळे होतो. एखाद्याने सुचवलेली एखादी कल्पना, नवी दिशा, मौलिक मुद्दा दुसऱ्याला प्रेरक ठरतो. त्याला प्रतिसाद म्हणून, कळत-नकळत इतर जण दुसरी कल्पना सुचवतात. एवढाच दुसऱ्याच्या कल्पनेचा उपयोग होतो.

'कल्पनास्फोट' एकट्यानेही खेळता येतो व विचारप्रक्रिया बाजूला ठेवून, नव्या विचारांना चालना देणाऱ्या तंत्रांचा वापर करता येतो. या वेळी अन्य कोणाच्या 'कल्पनासाम्राज्यात' रस घेण्याचा प्रश्नच नसतो.

**प्रश्न :** या पद्धतीचा उपयोग करून एखादं खेळणं तयार होणं शक्य आहे का? (उदा. 'स्पेलोफन' सारखं)

मुळातच 'सुचण्याची प्रक्रिया' हा विषय उपेक्षित आहे, व्यवहारी-उपयुक्त असणे, तार्किक विचार करणे यांत जेवढे संशोधन होते, त्याच्या तुलनेत सुचणे, सर्जनशील होणे यांबाबतचे संशोधन जवळ जवळ 'शून्य'च म्हणावं लागेल. हा दृष्टी बदलण्याचा प्रश्न आहे. ती आधी बदलायची, मग त्याचे महत्त्व पटेल व सर्वमान्य होईल. नंतर त्याचा अभ्यास आणि संशोधन. हे जसे आणि ज्या प्रमाणात होईल, तसे या तंत्राचा उपयोग करून खेळणी तयार होतील. तोवर कल्पनास्फोटाला हा विषय मात्र छान आहे.

**प्रश्न :** (या लेखाची) परिशिष्टे पाहता व्यक्तीच्या पूर्वज्ञानाचा विचार करणं आवश्यकच वाटतं. तेव्हा साहजिकच वयोगट, पूर्वज्ञान, कार्यक्षेत्र यांच्या सापेक्षतेनेचं या खेळातील लोकांचे गट करावे लागणार.

गट करावे लागत नाहीत, ते असतातच. अनेक विशिष्ट कारणांनी आपण एकत्र जमतो. जेवताना कुटुंबीय एकत्र बसतो, 'भाषा' आणि 'जीवन'च्या संपादकांची बैठक, कार्यकारी मंडळांच्या सभा, असे गट असतात, या वेळी हा खेळ घेता येईल. ६ मे १९९२ रोजी पाटबंधारे खात्याच्या अधिकारी प्रशिक्षण महाविद्यालयात 'चट योजनांचे प्रशिक्षण' होते; त्यावेळी मी घेतलेला 'चट योजनांचे प्राथम्यक्रम व मापनदंड' या विषयावरच्या व्यवस्थापनात कल्पनांच्याद्वारे हा खेळ घेतला व त्यात २७ अधिकाऱ्यांनी ५ मिनिटांत ३८ कल्पना सुचवल्या. परिशिष्टातही काही उदाहरणे दिली आहेत. यांवरून हे स्पष्ट होईल, की जिथे शक्य होईल, तिथे हा खेळ घ्यावा, खेळावा.

**प्रश्न :** या कल्पनांचे मूल्यमापन कोणी करायचं, कसं करायचं, याचं काही सूत्र सांगता येईल का?

काही विशिष्ट / समान उद्दिष्टे असलेल्या व्यक्ती एकत्र येतात, तेव्हा हा खेळ खेळता येतो. सुचलेल्या कल्पनांचे मूल्यमापन या खेळात सहभागी होणाऱ्या व्यक्तीच करतात. 'संयोजका'ची जबाबदारी कल्पनास्फोटाचा उद्देशच कल्पनाच्या मूल्यमापनाचे सूत्र सूचित

करतात. अनावश्यक, पुनरुक्त, अव्यवहार्य, प्रतिकूल कल्पना वगळून नवीन, मौलिक, नवी दिशा देणाऱ्या, उपयुक्त अशा कल्पना निवडता येतात. विश्लेषण, वर्गीकरण, निकषशोध व त्यांनुसार अंतिम निष्कर्ष व त्यांचा वापर या पायऱ्याही क्रमाने वापरता येतात. या वैचारिक प्रक्रिया आपण नेहमीच वापरतो, यामुळे त्या त्या वेळी, त्या खेळातील कल्पनांचे मूल्यमापन करता येईल.

**प्रश्न :** लेखक / कवी / नाटककारांच्या कृतिसत्रात या तंत्राचा उपयोग करायचा झाल्यास, त्याची हाताळणी करताना कोणती काळजी घ्यावी लागेल?

खेळाचे नियम पाळले जातील, नव्या कल्पना सुचण्यासाठी पुरेसे उत्तेजन दिले जाईल, अशा प्रकारची काळजी सहभागी व्यक्तींनी व संयोजकाने घ्यायला हवी. याचा विस्तार लेखात आहेच. 'टीका-टिप्पणी बंद' ही काळजी घेणे आवश्यक आहे. टीकेमुळे नवा विचार/कल्पना उगवता क्षणीच कशी नष्ट केली जाते, हे तिथल्याच एखाद्या उदाहरणावरून लक्षात आणून देणे प्रोत्साहन ठरते.

**प्रश्न :** या खेळाचा सर्जनशीलतेशी संबंध जोडता येईल का ?

सर्जनशीलता ही दैवी देणगी नसून, ती प्रत्येकात असते. ती ओळखणे, शिकणे, शिकवणे व तिचा विकास करणे हे शक्य आहे, या विचारातून व संशोधनातूनच तर 'ब्रेन स्टॉर्मिंग' या खेळाचा उगम झाला. सुचण्याची प्रक्रिया महत्त्वाची आहे, हे ध्यानी आले व त्याचे एक साल बनले. सर्जनशीलतेला उत्तेजन देणे, तिचा विकास करणे हेच कल्पनास्फोटाचे मुख्य सूत्र आहे.

**प्रश्न :** सर्जनशील लेखकाच्या कल्पना व सामान्य व्यक्तीच्या कल्पना यांत काही गुणात्मक फरक पडतो का?

ज्यांना मौलिक, नव्या भन्नाट कल्पना संख्येने खूप सुचतात व ज्या ते प्रत्यक्षात आणू शकतात, त्यांनाच सृजनशील/सर्जनशील म्हटले जाते, बाकीच्या व्यक्तींना आपल्यातील 'सर्जन'शक्तीची जाण नसते आणि व्यावहारिक प्रतिष्ठेचा आणि 'विचार करण्याच्या' सवयींचा एवढा प्रचंड प्रभाव त्यांच्यावर असतो, की नवनिर्माण क्षमता केव्हा व कशी चिरडली जाते, हेच लक्षात येत नाही. कल्पनास्फोटासारखे खेळ यातून मार्ग काढतात. फक्त शक्य त्या प्रत्येक ठिकाणी त्यांचा वापर केला पाहिजे.

**सुहास मेहेंदळे**

..................................

**टीप :** या पुरवणीची मूळ संहिता गहाळ झाल्यामुळे काही ठिकाणी मजकूर तुटल्यासारखा वाटतो. त्याबद्दल दिलगीर आहोत.

**— संपादक**

# ग्रामीण स्त्री : जीवन आणि भाषा

विजया देव

पुण्याजवळच्या एका खेड्यात पाच वर्षांपूर्वी एक अभ्यास प्रकल्प हाती घेण्यात आला होता. 'द डॅनिश कौन्सिल फॉर डेव्हलपमेंटल स्टडीज्' ने ह्या ग्रामीण जीवनाचा अभ्यासाचा प्रकल्प पुरस्कृत केला होता. एक अभ्यासक म्हणून या प्रकल्पात सामील होण्याची संधी तेव्हा मला मिळाली.

गावाची आर्थिक, सामाजिक, राजकीय, ऐतिहासिक अशी माहिती, त्या कोंदणात निवडक कुटुंबांचे चित्र व शेवटी व्यक्तींचा अभ्यास अशा क्रमाने सर्व स्तरांवर माहिती गोळा करायची होती. स्त्री-पुरुषांचा अभ्यास करताना नातेसंबंध, धर्मविषयक समजुती व विचार, आज्ञापालन, काळाची जाणीव, बदल व नावीन्य यांकडे पाहण्याची तऱ्हा अशा विविध संकल्पनांवर त्यांना बोलते करणे व त्यातून एकेका व्यक्तीच्या भावना, विचार, कृती यांचा आलेख उभा करणे असे आमच्या कामाचे स्वरूप होते. खेड्यातील बायकांना मोकळेपणाने बोलायला लावायचे, म्हणजे त्यांच्याशी बोलणाऱ्याही बायकाच हव्यात. घरातील बाई चुलीशी असेल, तर थेट स्वयंपाकघरात शिरून सारवलेल्या जमिनीवर बसून, हळूहळू इकडचे तिकडचे बोलत आम्ही तिचे विचारचक्र सुरू करत असू. प्रत्येक स्त्री-अभ्यासकाला ठरावीक स्त्रियांच्या मुलाखती घ्यायच्या होत्या. सामूहिकपणे नव्हे, सुट्यासुट्या. त्यामुळे एकासएक असा संवाद चांगला होत असे.

या संभाषणमालिकांतून खेड्यातील बायकांची भाषा कानांवर पडली. तिच्या निरीक्षणातून काही निष्कर्ष काढता आले. ग्रामीण जीवनाचा जो अभ्यास प्रकल्पांतर्गत होता, त्याच्याशी या भाषिक निरीक्षणांचा तसा काही संबंध नव्हता. हा लाभ अकल्पितपणेच झाला होता.

बायकांच्या बोलण्यातील प्रथमपुरुषी सर्वनामांचा वापर आणि म्हणींची योजना यांनी मला विचार करायला लावला. या दोन गोष्टींनी लक्ष वेधून घेतल्यामुळे त्यांचे वेगळेपण कशात आहे, काय आहे, याचा विचार इथे केलेला आहे.

एक गोष्ट प्रकर्षाने जाणवली, ती अशी, की एकंदरच येथील लोकांच्या बोलण्यात 'मी-आम्ही'चा आढळ कमीच होता. आणि जेव्हा ही सर्वनामे येतात, तेव्हा त्यांचा आशय नागर बोलीतल्यापेक्षा भिन्न होता. खेड्यातील माणूस स्वतंत्र व्यक्ती म्हणून स्वतःचा विचार न करता कुटुंबाचा एक भाग म्हणूनच बहुतांशी वावरत असतो. इतर नात्यागोत्यांच्या संदर्भात स्वतःकडे

बघतो. कुटुंबाचं व्यापक जाळं तोडून, फक्त 'मी' पणाची भावना सहसा व्यवहारात प्रबळ होत नाही. पुरुष आणि बायका-दोघांच्याही बोलण्यांत हे आढळले. बाई घराशी अधिकच बांधलेली. काही बायकांच्या बोलण्यात तर 'मी' या प्रथमपुरुषी सर्वनामाचा जवळ जवळ अभावच होता.

जीवनाच्या सर्व बाजूंवर त्यांना अनेकदा बोलते केलेले असल्यामुळे या 'मी' च्या कमतरतेची काही खोलवर रुजलेली कारणे सांगता येतील. बायकांना घरगुती गोष्टींत स्वातंत्र्य नाही. बाहेर काय घडतंय्, याची फारशी माहिती नाही. त्या मिळवत्या नाहीत. घरकामांचे क.. उपसणारी एक व्यक्ती एवढेच त्यांचे जीवन. उन्हापावसांत नदीवरून पाणी भरणे, येता जाता सरपण गोळा करणे, गोवऱ्यांसाठी शेण उचलून आणणे, त्यांच्या गोवऱ्या थापणे व 'चूल आणि मूल' या रगाड्यात त्या सतत गुंतलेल्या असतात. 'मी' ची दखल घ्यायला त्यांना कुठली फुरसत ? कुणाची तरी बायको, कुणाची तरी सून, मुलांची आई, दीर-नणंदांची भावजय अशा भूमिकांतून तिचे स्वतःचे स्थान ठरते. तासाभराच्या अंतरावर असलेल्या पुण्याला यावेसे वाटले, तर नवऱ्याच्या मर्जीवर विसंबून महिनोन् महिने निघून जातात. आपल्या कुटुंबाच्या मालकीची जमीन किती आहे, नुकतीच नवऱ्याने नवी सायकल घेतली, तिची किंमत काय, याची उत्तरे तिला ठाऊक नसतात, कारण 'विचारलं, तर राग येतो आमच्या इथे !' तिचा मी दबला आणि दडपला गेलेला असल्यामुळे भाषेतही क्वचितच प्रकटतो.

काहींच्या बोलण्यांत 'मी' ऐवजी आम्ही / आपण येत असे. मात्र त्यात आत्मगौरवाची भावना किंवा आत्मविश्वास नव्हता; तर 'मी' ची स्वतंत्र दखल घेण्याऐवजी सामूहिकपणाचा आधार घेण्याचा प्रयत्न त्यात दिसला. 'आपल्याला या बाबतीत कोण विचारतंय् का ? ', 'आम्ही आपण होऊन समोर जात नाही,' ही वाक्यं बोलणारी बाई स्वतःबरोबरच सर्वच घरातल्या बायका-सुनांना गोवून एकत्रित विधान करते.

यांच्यापैकी एक बाई कायम स्वतःचा उल्लेख 'आम्ही' असा करत असे आणि त्याचा आशयही वेगळा होता. स्वतःकडे ती जबाबदार गृहिणी, तीन मुलांची आई आणि या घरची सून म्हणूनच पाहते. सासू-सासरे गेले. पण त्यांच्याविषयीचा दबदबा तिच्या मनात आहे. नवऱ्याचा तिला पाठिंबा आहे. त्यामुळे थोडं-फार शिकून आरोग्य-सेविका म्हणून ती काम पाहते. शिवाय नवरा गावात नसेल, तर घरचे दुकानही पाहते. जबाबदारीची जाणीव आणि स्वतःच्या विविध भूमिकांबद्दल आदर यातून ती स्वतःला आम्ही म्हणत असेल का ? तिचं नाव सुनीता. सासू-सासरे सुनीता म्हणून हाक मारत असत; पण 'मालक मात्र आम्हांला नावानं हाक मारत नाहीत', इति ती. वास्तविक गावातली बाकीची घरं, बायका, मुलं जशी दिसत होती, तसंच तिचं घर (काहीस अंधारं), मुलं (मळकट आणि नाक वाहणारी) आणि ती दिसत, वागत होती. म्हणजे गावापेक्षा वेगळा, उठून दिसणारा घरंदाज खानदानीपणा तिथे होता,

असं मुळीच नव्हे.

हिच्या उलट, एका बाईच्या बोलण्यात प्रामुख्याने 'मी' येत असे. 'माझं म्हणणं', 'मी म्हणते' यानंच तिच्या वाक्याची सुरुवात होत असे. घरात भयंकर गरिबी. नवरा नोकरीच्या निमित्ताने बाहेरगावी. हिचा स्वभाव हुकमत गाजवणारा. सासू-सासऱ्यांना सून-मुलं यांची जबाबदारी पेलवेना, तेव्हा त्यांनी तिला वेगळं राहायला भाग पाडलं. तेव्हापासून घराची जबाबदारी हिच्यावर. शिक्षण नाही, आधार नाही, पैसा नाही, मुलं उनाड हा सगळा भार पडल्यामुळं तिची 'स्व' ची जाणीव प्रखर बनली. 'इतक्या वर्षांत गावात तुम्हांला काही सुधारणा झालेली, काही बदल दिसतो का ?' म्हणून विचारलं, तेव्हा ती फटकन् म्हणाली, 'माझी सुधारणा नाही, तर गावाची कुठली ?'

सर्वसाधारणपणे वडीलधाऱ्यांचा उल्लेख ते समोर नसतानाही आपण आदरार्थी करतो. पण या गावात मात्र हा उपचार टिकून राहत नसे. सासू, वडील यांचेही एकेरी उल्लेख होत. 'माझा बाप', तिचं (म्हणजे सासूचं) माहेर' वगैरे. त्यात अनादर किंवा तुटकपणा नसे, तर संभाषणाच्या ओघात, मोकळेपणाने बोलण्याच्या आवेगामुळे असे होत असे.

या बोलण्याचे आणखी एक वैशिष्ट्य, म्हणजे म्हणी व म्हणीसदृश साधारणीकरणे वापरण्याकडे असलेला कल. अनुभवाला स्वतंत्रपणे शब्दबद्ध करण्याऐवजी मुशीतून व्यक्त करणं केव्हाही सोपं असतं. 'मी' ऐवजी समावेशक 'आम्ही', 'आपण' वापरण्याप्रमाणे पूर्वापार चालत आलेल्या म्हणी, वाक्प्रचार यांत साठवलेल्या अनुभवपरंपरेचाच हा स्वतंत्र अनुभवही एक भाग बनून जातो व एकंदर मोठया प्रवाहात सामील होतो.

या सूत्रबद्ध, चपखल बोलण्यामुळे या भाषेला एक नादमयता, वेधकता आली होती, हे खरं. त्याची ही काही उदाहरणं, आणि त्यांचे संदर्भ :

१. 'शक्तीसारखी भक्ती करायची'. गावात दरवर्षी जत्रा असते. त्यासाठी सर्वांना वर्गणी द्यावी लागते. तिची सक्ती होते का, ठरावीक रकमेसाठी अडवतात का, असे विचारले असता एकीने सांगितले, 'शक्तीसारखी भक्ती करायची.' म्हणजे परवडेल, तितकं द्यायचं. बळजबरी नसते.

२. 'दिलं, तिथं मेलंच पाहिजे.' सतत आजारपण, नवऱ्याचा जाच, गरिबी, एकंदर रटाळपणा याचा कंटाळा आलाय्; पण त्यातून सुटकेचा मार्ग नाही. दिवस इथेच आणि असेच काढले पाहिजेत, एवढं एकीला यातून सांगायचं होतं.

३. 'डोंगर जळला, तर जग बघतं
मन जळलं, तर कोण बघतं ?

एका बाईनं आपली व्यथा या शब्दांत सांगितली. घरात गरिबी, मूलबाळ नाही. पहिल्या बायकोला मूल नाही, म्हणून नवऱ्यानं हिच्याशी दुसरं लग्न केलं. ही वयानं लहान. हिलाही मूल झालं नाही. ही व्यथा लोकांना कशी कळणार ? ठसठशीत दुःखं दिसतात; पण मनाची

वेदना कुणाला ऐकू येणार, हा तिचा प्रश्न वरील पंक्तीतून शब्दबद्ध झाला.

४. 'नदीचं पाणी अन् पायाची गाडी'.

पाण्याला केव्हा जाता, असं एकीला विचारलं, तेव्हा तिनं हे उत्तर दिलं. तिला म्हणायचं होतं, तुमच्या शहरातल्या नळांना पाण्याच्या वेळा असतात. शिवाय ते (तिच्या मते) शिळं. नदी भरवशाची. सतत वाहत असते; आणि तिथे जायला दुसऱ्या कुठल्या वाहनावर अवलंबून राहायला नको. सारांश, ठरावीक वेळेलाच पाण्याला जातो, असं नाही, गरजेप्रमाणे दिवसभरात कितीही खेपा करतो.

.. 'पाऊसपाव्हण्यासारखं'. एकीनं आपलं माहेरी जाण्याचं वेळापत्रक सांगितलं, ते या शब्दांत. म्हणजे, पाऊस येतो, तो पृथ्वीवर पाहुणा म्हणून,कायम थोडाच राहतो ? तसंच माहेरी जायचं, तर ते चार दिवसांसाठी, वर्षाकाठी एखाद-दोनदा.

६. 'याचं घर टीप, त्याचं घर टीप'.

कोंबडया दाणे टिपत अंगणात फिरतात, तशी काही बायकांना असते सवय सारखं उठून शेजारी-पाजारी जाऊन बसायची. मला मात्र घरातली कामंधामं टाकून सारखं इकडे तिकडे भटकायची सवय नाही, हे सांगायला या बाईनं या चित्रमय अभिव्यक्तीचा आश्रय घेतला, 'याचं घर टीप, त्याचं घर टीप, असं मला नायू करता येत'.

७. 'जन्म येणे'. 'लग्न झालं, तेव्हा तुम्ही किती वर्षांच्या होता ?' असा प्रश्न एका पन्नाशीच्या बाईला विचारला. तेव्हा तिनं सांगितलं, वय माहीत नाही, पण 'तेव्हा मला जन्म आला होता'. म्हणजे ती वयात आली होती.

स्त्रीमधील शारीरिक घडामोडीला तिच्या मनात आणि सांस्कृतिक संचितात एक महत्त्वाचं, अर्थपूर्ण स्थान आहे. स्त्रीमनात ते इतकं रुजलेलं आहे, की जणू आईच्या पोटी येतो, तो मनुष्यजन्म आणि 'स्त्रीजन्म' लाभतो, तो वयात येण्यानं. अस्तित्व उमलतं, ते या घटनेनं. प्रचंड सूचक सामर्थ्य असलेले शब्द तिनं किती सहजतेने वापरले होते.

ग्रामीण जीवनातील साचेबंदपणा, रूढिबद्धता आणि सांकेतिकता यांचा प्रत्ययच या भाषिक नमुन्यांतून आला. प्रथमपुरुषी एकवचनी सर्वनामाचा अत्यंत कमी वापर आणि साधारणीकरणाकडे असलेला कल असे सुचवतो, की 'स्व'चा व्यक्तिनिष्ठ स्वरूपातील आविष्कार फार मर्यादित स्वरूपात होतो.

**सुप्रिया, ६१/१४ एरंडवणे पुणे ४११००४**

# मराठी भाषा शिकताना आलेला अनुभव

**ईन्ना लिमानोव्हा**

(लेनिनग्राड विद्यापीठातून आलेली रशियन विद्यार्थिनी)

मी आता मुंबई विद्यापीठात मराठी विभागात मराठी दाखला व मराठी-पदविका अभ्यासक्रमात शिकते. त्यापूर्वी मी लेनिनग्राड विद्यापीठात भाषाशास्त्र व भारतीय भाषा शिकत होते. मला लहानपणापासून भारतामध्ये रुची होती. भारतीय भाषा, संस्कृती, इतिहास याबद्दल मी पुस्तके वाचली. त्यामुळे पदवी मिळवून मी लेनिनग्राड विद्यापीठाला अर्ज केला. तिकडून मला इथे भारतामध्ये भाषेचा सराव घेण्यासाठी पाठविले.

मराठी भाषा सोपी नाही. हिंदीपेक्षा ती कठीण आहे, असे वाटते. त्याची मूळभाषा संस्कृत असून इथे पुष्कळ संस्कृत शब्द आहेत. संस्कृत, मराठी, स्लाविक (रशियन, युक्रेनियन) या भाषा एका भाषेच्या कुटुंबात असून तेथे पुष्कळ सारखे शब्द व मूळे मिळतात. उदाहरणार्थः मराठीत - बोलतात, राशियन भाषेत - बोलतायुत. अंक पण सारखे आहेत - मराठीत - दोन, तीन, चार, पाच. राशियन भाषेत - द्वा, त्री, चेतरे, प्यात. मला हे सागळे शब्द पाहून फार कौतुक वाटते. इतक्या वेगळया भाषात सारखे शब्द असतात म्हणून त्याचे मूळ एकही प्राचीन भाषा आहे. मला हे सारखे शब्द शोधायला फार आवडते.

संस्कृत भाषेहून मराठी भाषेत व्याकरण, शब्द कसे बदलले त्यात मला रुची पण आहे. मला संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश, प्राचीन व आजकालची मराठी याचा भाषाशास्त्रीय दृष्टिकोणातून तुलना करायला फार आवडेल.

पण त्यासाठी मराठीत फार शिकलेले होणे पाहिजे. आणि हे अत्यंत कठीण आहे. मराठी व्याकरण व शब्द मी शिकते. पण उच्चारण मला येत नाही. मी कधी-कधी मंडईत जाऊन त्यातील लोकांशी मराठीत बोलायचा प्रयत्न करते. पण मी त्यांना काय सांगते, त्यांना समजत नाही ! ते मला समजत नाही हे पाहून मला वाईत वाटते ! ते मला का समजत नाही कोणास ठाऊक!

माझ्या उच्चारणात चुका असतात - असे वाटते. राशियन भाषेत दीर्घ व ऱ्हस्व स्वर नसून मला त्यात फारक सांगायला फार कठीण आहे. त्यामुळे मला उच्चारणावर फार काम करायला पडेल. पण मी मराठी नक्की छान बोलणार. मराठी लोकांची परांपरा, राहणी पाहण्यासाठी ही भाषा बोलायला फार आवश्यक आहे. मी कुठेही येऊन मराठी बोलू लागले, तर लोकांना इतके कौतुक, इतका आनंद वाटतो, की ते मला सगळे इथे दाखवतात व माझ्याशी बोलतात. त्यासाठी व छान मराठी साहित्य वाचण्यासाठी मी मराठी नक्की छान शिकणार.

**विद्यापीठ स्त्री-वसतिगृह, कलीना, सान्ताक्रूझ, मुंबई ४०००९८.**

# भाषा-विकास केंद्र : एक अनोखा अनुभव

वर्षा सहस्रबुद्धे

'चला, आता हा खेळ थांबवू या -'

'नाही, ताई ! अजून एकच, अजून एकच शब्द बनवतो.'

'काय मग, किती शब्द बनवले ?'

'ताई, तीस'...

'बत्तीस' ...

'ताई, अठ्ठेचाळीस...'

केंद्रात लवकर आलेल्या मुलांना गुंतवून ठेवण्यासाठी म्हणून चार- सहा अक्षरं दिली आणि त्यांच्या बाराखड्यांमधून शब्द बनवायला सांगितले. मागाहून येणारी मुलंही त्यात गुंतत गेली. मुळात ठरलेला कार्यक्रम थोडा पुढे लांबवला. मुलं या खेळात इतकी रमली, बुडून गेली, की त्यांनी सत्तरहून जास्त शब्द शोधले. त्यांनी शोधलेल्या शब्दांवरून मग गप्पा झाल्या. 'सात' या शब्दावरून मुलांना इंद्रधनुष्याचे सप्तरंग आठवले, सात स्वर, सात समुद्र, सप्तर्षी.... साध्या शब्द शोधण्याच्या खेळातल्या एका शब्दातून पुढे भौतिकशास्त्र, संगीत, नाही तर खगोलाशी संबंधित आणखी कितीतरी गप्पा होऊ शकल्या असत्या. माझ्या शिक्षकी मनानं त्याची नोंदही घेतली.

हा प्रसंग आहे नारळकर प्रतिष्ठानातर्फे पुण्यामध्ये चालवल्या जाणाऱ्या भाषा-विकास-केंद्रातला. मातृभाषेच्या विकासासाठी मुलांना कोणकोणत्या पद्धतींनी मदत करता येईल, याचा शोध घेण्याच्या दृष्टीनं तिसरी-चौथीमधल्या मुलांसाठी जुलै, १९९१ मध्ये या केंद्राचे वर्ग सुरू झाले. चौदा मुलांनी या वर्गात नावं नोंदवली.

## उद्देश

भाषेविषयी, शब्दांविषयी मुलांना कुतूहल वाटावं, आपुलकी वाटावी; आपल्या भाषेचा स्वभाव, वैशिष्ट्यं, आपल्या आयुष्याशी असलेलं तिचं नातं समजून घेण्याची सुरुवात या वयात व्हावी आणि प्रत्यक्षात आकलन-संभाषण-वाचन-लेखन या चारही अंगांनी भाषाव्यवहाराचा पाया पक्का व्हावा, या हेतूनं भाषाकेंद्राचे कार्यक्रम आखले. मातृभाषेवर आपलं प्रेम असेल, तिच्यावर जर आपलं प्रभुत्व असेल, तर इतर कोणतीही भाषा शिकताना

येणारे अडथळे आपण सहजी ओलांडू शकतो. मातृभाषेचा विकास आणि आपली कल्पनाशक्ती, विचारशक्ती यांचा अत्यंत निकटचा संबंध आहे, हे ध्यानात घेऊन भाषेसारखं लवचीक माध्यम हाताळण्याची मुलांची क्षमता आणि निर्मितिक्षमता विकसित करण्यासाठी पोषक असं वातावरण निर्माण करण्याची धडपड या केंद्रामध्ये केली जाते.

दर शनिवारी आणि रविवारी दोन-दोन तास मुलं केंद्रात येतात. शब्दकोडी, भाषेचे खेळ, गोष्टी, अनुभवकथा, गाणी, कविता, संदर्भग्रंथ वापरणं, सहली, भेटी, वाचन, चित्रनिरीक्षण, चित्रांचा रसास्वाद, पारदर्शिका पाहणं अशा वैविध्यपूर्ण कार्यक्रमांतून भाषा- विकास-केंद्र वाटचाल करत आहे. आखलेले कार्यक्रम, त्यांत केलेले फेरबदल, मुलांचा प्रतिसाद, मुलांची वैशिष्ट्यं आणि लकबी यांच्या तपशीलवार नोंदी सुरुवातीपासूनच ठेवल्या आहेत. केंद्राच्या कार्यक्रमांमधे वेळोवेळी पालकांचीही मदत घेतली जाते. 'मुलांना वाढायला मदत करणं, त्यांना समृद्ध अनुभव देणं हे शिक्षक-पालक सर्वांचं काम आहे' ही या भाषा-केंद्राच्या पालकांच्या सहभागातून येणारी भावना 'फी भरली, आमची जबाबदारी संपली,' या सर्वसामान्यपणे आढळणाऱ्या दृष्टिकोनाला छेद देऊन जाण्याइतकी रुजली आहे, हे आवर्जून नमूद करावंसं वाटतं.

## गोष्टींचा वाटा

भाषा केंद्रात आम्ही गोष्टींचा भरपूर वापर करतो. गोष्टी ऐकायला मोठ्यांनाही आवडतं. लहानांना तर आवडतंच आवडतं. 'गोष्ट' या एका शीर्षकाखाली गोष्टी ऐकणं, गोष्टी सांगणं, चित्रांवरून गोष्टी बनवणं, अर्ध्या गोष्टी पूर्ण करणं, गोष्टीतल्या वर्णनानुसार अभिनय करणं, विस्कळीत गोष्टी जुळवणं वगैरे कितीतरी कार्यक्रम असतात. यांमधे जसं अबोल, बुजऱ्या मुलाला मुद्दाम बोलतं केलं जातं, तसंच जरा जादाच बोलणाऱ्याला थोडंसं थोपवून इतरांनाही संधी देण्याची, ऐकणाऱ्याची भूमिका घेण्याची गरज पटवून देता येते. शब्द, वाक्प्रचार, शैली या अंगांनी विकासाच्या वाटेवर पावलं पडतात. गोष्टी ऐकता ऐकता भाषा-केंद्रातल्या मुलांची परीकथांशी, देश-विदेशच्या लोककथांशी ओळख होते. प्र.के.अत्रे, जी.ए.कुलकर्णी, राम पटवर्धन आणि अन्य लेखकांच्या दर्जेदार मराठी बालवाङ्मयाचा आस्वाद मुलं घेतात. कापून, विस्कळीत करून ठेवलेल्या गोष्टी जुळवताना मुलांना मजा तर येतेच, शिवाय तर्क लढवण्याची क्षमता वापरली जाते आणि वाचनाच्या कौशल्याचा वापर अगदी हसतखेळत, नकळत केला जातो. चित्रांवरून गोष्टी जुळवताना मुलांच्या निरीक्षणशक्तीचा आणि कल्पनाशक्तीचा कस लागतो. अर्ध्या गोष्टींचा शेवट करताना जितकी मुलं, तितके विविध शेवट असलेल्या गोष्टी तयार होतात. ऐकलेल्या गोष्टींची पुस्तकं जर मुलं यायच्या वेळेला सहज नजरेला पडतील, अशी काढून ठेवली, तर मुलं आपणहूनच पुस्तकं घेऊन गोष्टींविषयी,

त्यांतल्या प्रसंगांविषयी बोलतात आणि उजळणी मुद्दाम निराळी घेण्याची निकड पुष्कळ प्रमाणात कमी होते.

### भाषेचे खेळ

गोष्टींकडे जशी मुलं आकर्षिली जातात, तशी मुलांना आवडणारी आणखी एक गोष्ट, म्हणजे खेळ. एकेकटं किंवा गटागटानं खेळण्याच्या मुलांच्या वृत्तीचा वापर आपल्याला भाषाविकासासाठी करून घेणं नक्कीच शक्य आहे, असं आतापर्यंतच्या आमच्या अनुभवावरून ठामपणे म्हणता येईल. 'बंद' असलेल्या, बुजऱ्या, अबोल मुलांना दिलखुलास हसवण्याची, मोकळं करण्याची जबरदस्त ताकद खेळांमधे आहे. ती भाषेच्या खेळांमधेही आहे. इथं मुलं आहेत, की नाहीत, इतकी चिडीचूप बसलेली असताना, 'आता या मुलांना खुलवायला करावं तरी काय ?' असं वाटायला लावणाऱ्या बिकट प्रसंगांमधे भाषेचे खेळ वेळोवेळी मदतीला धावून आल्याचं मला आठवतं. त्यामुळं मी तर म्हणेन, की प्राथमिक पातळीवर भाषा शिकवणाऱ्या शिक्षकाजवळ खेळांची पोतडीच भरलेली हवी. ही पोतडी सदैव भरलेली राहण्यासाठी शिक्षकाची दृष्टी, त्याची इच्छा, आणि खेळ अर्थपूर्ण होण्यासाठी आवश्यक ते ज्ञान या गोष्टी महत्त्वाच्या आहेत.

विविध हेतूंनी खेळ वापरता येतात. शब्दसंपत्ती, उच्चार, वाक्यरचना, व्याकरण, अर्थच्छटा अशा वेगवेगळ्या संदर्भांत विषयाला तोंड फोडण्यासाठी, विषय स्पष्ट करण्यासाठी, गप्पांचा गोशवारा काढून घेण्यासाठी... किती तरी प्रकारे भाषेचे खेळ खेळता येतात. याचा सर्वांत मोठा फायदा, म्हणजे मुलं आनंदानं, स्वेच्छेनं, उत्साहानं अभ्यासच करीत असतात ! आणि आपण अभ्यास करतो आहोत, हे त्यांच्या गावीही नसतं.

नमुन्यादाखल व्याकरणाच्या काही खेळांचा उल्लेख करते : नाम, विशेषण, क्रियापद या संकल्पना समजून घेतल्यानंतर त्यांची उदाहरणं लिहिलेले, नाकाला पेपर-क्लिपा अडकवलेले कागदी मासे लोहचुंबकाच्या गळानं पकडून त्यांचं वर्गीकरण मुलांनी केलं. शब्दांच्या याच तीन जातींची उदाहरणं लिहिलेले पत्ते पालथे टाकून, ते आळीपाळीनं उलथून विशेषण-विशेषण, क्रियापद-क्रियापद अशा जोड्या जुळवल्या.

'वेगळे काय ते ओळखा' या खेळातून विभक्तिप्रत्यय, काळाचे प्रत्यय यांच्याशी मुलांची ओळख झाली.

### संदर्भग्रंथांचा वापर

मुलांना लहानपणापासूनच शब्दकोश आणि इतरही कोश हाताळण्याची संधी मिळायला हवी. त्याची सवयही व्हायला हवी. कोश वापरून काही माहिती काढणं अंगी बाणण्यासाठी





अनुक्रमणिका

पुन्हापुन्हा ते हाताळण्यासाठी त्यांना उद्युक्त करायला हवं. यातून स्वयं-अध्ययनाची वाट चोखाळण्याची त्यांच्यांतली कुवत आपण जोपासू शकतो.

भाषा केंद्रातल्या मुलांनाही कोशांचं हे दार खुलं व्हावं, ही इच्छा आमच्या मनात होतीच. पण मुलांच्या हाती द्यावेत, असे कोश मराठीमधे औषधालाही नाहीत, ही वस्तुस्थिती आहे. 'भारतीय संस्कृतिकोशा'ची लहानांसाठी असलेली आवृत्ती वगळली, तर खास मुलांसाठी असलेले कोशवाड्.मयच मराठीत नाही ! नऊ-दहा वर्षांच्या मुलाला सहजी हाताळता येईल, वापरता येईल, असा मराठी-मराठी शब्दकोश आपल्याकडे उपलब्धच नाही !

मोठ्यांसाठी असलेल्याच कोशांपैकी आपट्यांचा 'मराठी शब्दरत्नाकर' मुलांबरोबर वापरून पाहायचा, असं ठरवलं, त्या वेळी मनावर खूप दडपण होतं. मराठीतले एकूण ध्वनी, त्यांचा क्रम, बाराखडी यांच्याशी संबंधित खेळ खेळून कोश वापरण्याची जय्यत पूर्वतयारी काही दिवस केली. मुलांना कठीण वाटलेले काही शब्द घेऊन 'त्यांचा अर्थ कुठे शोधायचा ?' असं विचारल्यावर 'आईला/बाबांना/बाईंना विचारायचं' अशी वेगवेगळी उत्तरं आली. 'आणि बाईंनाही नाही आलं, तर ?' यावरं 'मोठ्या बाईंना विचारू !' असंही एकानं सांगितलं. मग 'मोठ्या बाईंनाही माहीत नसलं, तर ? ...' अशी कठिण् परिस्थिती निर्माण करून मग शब्दकोश नावाच्या पुस्तकाविषयी त्यांना सांगितलं. कोश मुलांच्या पुढ्यात ठेवला. वर काय लिहिलं आहे, आत काय आहे, हे मुलांनी आपणहून कोश हातात घेऊन बघितलं. मग कठीण शब्द आता यात शोधू या, म्हणून शब्द शोधायला सुरुवात केली.

घरामध्ये आपण कुठलीही वस्तू कुठेही ठेवली, तर सापडणं कठिण ! असा दाखला देऊन या पुस्तकातही कुठलेही शब्द कुठेही लिहिले, तर सापडणं किती कठिण होईल, हे सांगितलं. शब्द ठरावीक ठिकाणी लिहिलेले असायला हवेत, हे मुलांना पटलं. पण मग आधी कोणते, नंतर कोणते हा क्रम ठरवायचा कसा ? अशी शंका त्यांना आली. आम्ही आधी खेळातून केलेली अक्षरांचा क्रम आणि बाराखड्यांविषयीची तयारी इथे कामी आली. भिंतीवर लावलेल्या वर्णमालेच्या मदतीनं अमुक शब्द अमक्याच्या आधी, की नंतर, याचा निर्णय लावायला मुलं शिकली. 'आ'कार' नंतर, 'अ'कार आधी; 'च' नंतर, 'ग' आधी असं करत करत कोणता शब्द आधी, कोणता नंतर, यांविषयी मुलांना उलगडा व्हायला लागला. दोन्ही शब्दांची पहिली अक्षरं तीच असताना दुसऱ्या अक्षरांच्या मदतीनं शब्दाची जागा ठरवायची, हे मुलांना कळलं. असा टप्प्याटप्प्यानं निर्णय घेत घेत शब्दाची जागा शोधण्याविषयी आत्मविश्वास आला. त्यानंतर आम्ही अर्थाकडे वळलो.

शब्दांची जागा शोधण्याचा खेळ मुलं आनंदानं खेळली. खेळतानाच कोश काळजीपूर्वक कसा हाताळायचा, पानं कशी उलटायची, वगैरे तांत्रिक गोष्टीही ती शिकली.

आपट्यांचा 'शब्दरत्नाकर' हा जुन्या काळचा. त्यात त्या काळात वापरात असलेले आणि आज प्रचलित नसलेले अनेक शब्द आहेत. तसंच, आज वापरात असलेले अनेक शब्द त्यात

नाहीत. आधुनिक मराठीचा बालशब्दकोश उपलब्ध नसल्यामुळे जुना कोश वापरावा लागतो, या एका अर्थानं लंगड्या बाजूचाच फायदा आम्ही केंद्रात करून घेतला. शब्दसुध्दा जन्मतात आणि वापरले नाहीत, तर मरून जातात; नवे शब्द येतात, पूर्वी नसलेले शब्द आज आहेत. थोडक्यात, भाषा बदलते. याचीही पुसटशी जाणीव केंद्रामधल्या मुलांना गप्पांमधून करून देता आली.

हळूहळू कोश वापरणं मुलांच्या अंगी बाणतं आहे. कोश वापरून अर्थ शोधायला मुलांना आवडतं, याची रोखीची पावतीच एका पालकांनी मध्यंतरी दिली. दिवाळीमधे भाऊबीजेचे पैसे साठवून त्यांच्या मुलीनं शब्दकोश घेतल्याचं त्यांनी कौतुकानं सांगितलं. केंद्रात केली जाणारी धडपड पालकांपर्यंत पोहोचते आहे, मुलांनाही ती हवीशी आहे, हे समजल्यावर अशा गोष्टी करून पाहण्याचा उत्साह आणखी वाढला. कोश वापरायला शिकवण्याची सुरुवात करताना जे दडपण मनावर होतं, त्याचा मागमूसही आता राहिलेला नाही.

### चित्रं आणि पारदर्शिका

पुण्यामधल्या सेंटर फॉर लर्निंग रिसोर्सेस् या संस्थेनं बालवाडी आणि प्राथमिक शाळेच्या मुलांसाठी काही स्लाइड्ज् बनवल्या आहेत. पत्राचा प्रवास, तऱ्हेतऱ्हेची घरं, फळं, भाज्या, पर्यावरण वगैरे विविध विषयांवरच्या या स्लाईड्ज् आहेत. प्रामुख्यानं विज्ञानाच्या अंगानं या स्लाईड्ज् बनवलेल्या असल्या, तरी भाषेच्या अंगानंही त्यांचा पुरेपूर वापर आम्ही भाषाकेंद्रात करतो.

स्लाईड्ज् किंवा चित्रांचं दृक्-माध्यम भाषा विकासासाठी खूपच प्रभावी ठरतं. मुलांचे पूर्वानुभव जागवणं, त्यांना विचाराला प्रवृत्त करणं, त्यांच्या कल्पनाशक्तीला धुमारे फुटण्यासाठी मदत करणं असे कितीतरी उद्देश त्यातून साध्य होतात. मुलांची संवेदनशीलता जागवण्याचं अवघड कामही चित्रांच्या मदतीनं जरा सुलभ होतं.

चित्रं पाहून मुलांनी केलेल्या लिखाणाचे काही नमुने इथं देते आहे : चित्र होतं नवजात बाळाचं आणि माकडाच्या पिल्लाचं. ते पाहून एकीनं लिहिलं आहे :

'मला ते माकड त्या बाळासारखे दिसत आहे. त्या माकडाचे कान बाळासारखेच मोठे आहेत. बाळाला काळे केस आहेत आणि माकडाला पांढरे केस आहेत. त्या माकडाने डोळे जरासे वटारले आहेत, तसे त्या बाळानीसुद्धा वटारले आहेत.'

बकरीचं पिल्लू एका मुलीची रिबिन ओढतं आहे, हे चित्र पाहून एकीनं लिहिलं आहे.

'तिचे नाव होते प्राची. ती खेडयातली गरीब मुलगी होती. तिचे दोन-तीन दात पडले होते. ती एका दगडावर बसली होती. पिल्लू तिची रिबिन ओढत होते. म्हणून ती ओरडत होती, रडत होती.'

कुणाच्याही मदतीखेरीज पूर्णपणे स्वतःच्या विचारानं, स्वतःच्या विचारानं, स्वतःच्या

कल्पनांनी मुलांनी केलेलं अशा प्रकारचं लिखाण हे मोठ्यांच्या अनुकरणानं केलेल्या लिखाणांपेक्षा निश्चितच मोलाचं ठरतं.

### सहली आणि भेटी

वर्गाच्या चार भिंतींच्या आतल्या अनुभवांबरोबरच बिनभिंतींच्या जगातले, निसर्गाच्या सहवासातले अनुभव मुलांनी घ्यावे, यासाठी भाषा केंद्राच्या कार्यक्रमात छोट्या सहलींचाही अंतर्भाव केला आहे.

टेकडीवर फिरायला जाऊन आल्यावर किंवा नदीकाठी पक्षी बघायला जाऊन आल्यावर मुलांनी केलेल्या लिखाणात सहजता जाणवते, जिवंतपणा जाणवतो. प्रत्यक्ष सहलीच्या ठिकाणी पक्ष्यांविषयी बोलणं, उंचावरून दिसणाऱ्या दृश्याविषयी बोलणं, झाडं, पानं यांच्याविषयी जाणून घेणं, एकत्र खाऊ बनवण्याचा सहानुभव घेणं असे अनेक शैक्षणिक अनुभव (learning experiences) पावलोपावली भेटतात, ते निराळेच.

सहलींच्या आयोजनात आणि प्रत्यक्ष कार्यवाहीत पालकांचा सहभाग नेहमीच असतो.

### गाणी

गोष्टी ऐकायला जसं मुलांना आवडतं, तसं गाणी गायलाही आवडतं. आमच्या केंद्रातल्या मुलांना मराठी गाण्यांबरोबरच आता हिंदी आणि इंग्रजी भाषेतली काही गाणी तोंडपाठ आहेत. त्यांतून त्या त्या भाषेतल्या अनेक शब्दांशीही त्यांची सहजगत्या ओळख झाली आहे.

मराठीमधल्या नव्या-जुन्या कवितांमधूनही वाङ्.मयातलं भाषेचं सौंदर्य; अर्थवाहीपणा हे मुलांपर्यंत पोहोचवता येतं.

### इंग्रजीची जोड

भाषा केंद्रात येणारी मुलं मराठी माध्यमाच्या शाळेत जाणारी आहेत. त्यांची इंग्रजीशी तोंडओळख आता झालेली आहे. केंद्रातल्या कार्यक्रमांतून, गाण्यांमधून, गोष्टींमधून, खेळांतून हे साध्य झालं आहे. अवयव, आसपासच्या वस्तू, अंक यांविषयीची सोपी वाक्यं इंग्रजीमधून बोलल्यावर समजणं आणि बोलता येणं या अंगांनी इंग्रजी शिकायला मुलांनी इथं सुरुवात केली आहे. पुढे औपचारिक शिक्षणात इंग्रजी शिकताना या पूर्वतयारीचा त्यांना नक्कीच फायदा होईल.

मातृभाषा संपन्न असण्याबरोबरच जोडीला (मातृभाषेच्या ऐवजी नव्हे !) इतर भाषांविषयी कुतूहल आणि प्रेम वाटणं, त्या आत्मविश्वासानं वापरता येणं हेही महत्त्वाचं आहे, हा दृष्टिकोन इंग्रजीची पूर्वतयारी करून घेण्यामागे आहे.

## मागे वळून पाहिल्यावर

वळून पाहिलं, तर हे लक्षात येतं, की मागे वळून पाहण्याएवढी वाट काही अजून चालून झालेली नाही. आपण अजून सुरुवातीचा टप्पा जेमतेम गाठतो आहोत. त्यातही ठरवलेल्या गोष्टींपैकी काही गोष्टी प्रत्यक्षात उतरवताना अडचण जाणवलेली आहे. केंद्राच्या वाट्याला येणारा वेळ मर्यादित आहे,त्यामुळे कितीतरी गोष्टींची पुनरावृत्ती करणं, त्यांना न्याय्य वेळ देणं शक्य होत नाही. उदाहरणार्थ, मराठीखेरीज इंग्रजी आणि हिंदीशी मुलांची ओळख करून देण्याचं उद्दिष्ट डोळयांसमोर होतं.त्यापैकी हिंदीला पुरेसा न्याय देता आलेला नाही. दुरून येणाऱ्या मुलांच्या येण्याजाण्याच्या अडचणीमुळे काही मुलं येण्याची बंद झाली. त्यावर आज तरी आम्ही काही उपाय करू शकत नाही. तरीही सर्वसाधारणपणे मनातल्या उद्देशांच्या दिशेनं वाटचाल आहे, असं निश्चित म्हणता येईल.

## भाषाकेंद्रातल्या कार्यक्रमांची वैशिष्ट्यं आणि त्यांचे दृश्य परिणाम

इथले कार्यक्रम साचेबंद नाहीत. त्यांत वैविध्य आहे. केंद्राच्या उद्दिष्टांच्या अनुरोधानं एक वर्तुळ काढून घेतलेलं आहेच. पण या वर्तुळाच्या परिघाच्या आत मात्र मुलांना भरपूर स्वातंत्र्य आहे. त्यामुळेच भाषा-केंद्रात एका छापाचं लिखाण कधीच आढळत नाही. मुलांच्या अनुभवविश्वाशी संबंधित विषयांवर बोलायला किंवा लिहायला मुलांना प्रवृत्त केलं जातं. त्यामुळं त्यांचं लिखाण स्वतःला स्फुरलेलं, खरं आणि मनापासून केलेलं असतं. मुलांचे स्वभाव, आवडीनिवडी, घरं, शाळा, त्यांचं दैनंदिन आयुष्य अशा कितीतरी घटकांची स्पष्ट किंवा अंधूक प्रतिबिंबं त्यांच्या लिखाणात उमटलेली दिसतात. मुलांचं लिखाण वाचताना म्हणूनच कधीही कंटाळा येत नाही, उलट, उत्सुकता वाटते. शुद्धलेखनाविषयी जागरूक राहण्याविषयी मुलांना जरूर सांगितलं जातं. मात्र त्यावर वाजवीहून जास्त भर मात्र देऊन मुलाला नाउमेद केलं जात नाही.

केंद्रातल्या वातावरणाचा एक प्रकारचा न दिसणारा परिणाम मुलांच्या मनावर, वाढीवर होत असेलच. पण दृश्य परिणामही उत्साह वाढवणारे आहेत. त्यांतला सर्वांत ठळक परिणाम, म्हणजे मुलांना इथे मोकळेपणानं बोलावंसं, लिहावंसं वाटतं. आपले अनुभव, त्यांविषयी आपल्याला काय वाटतं, आपल्या मनात काय आहे, हे न संकोचता निर्भीडपणे मुलं मांडतात. केवळ भाषाविकासाच्याच नाही, तर व्यक्तिमत्त्वाच्या विकासाच्या संदर्भातही हे महत्त्वाचं ठरतं.

भावंडांविषयी मुलांनी केलेल्या लिखाणातला काही भाग इथं देते.

'माझी बहीण आणि मी रोज खेळतो. पण कधीकधी भांडतो पण. आम्ही कधीकधी सायकल खेळतो. कधीकधी कॅरम, पत्ते. आम्ही कधीकधी भातुकली खेळतो. आम्ही दोघी

नीट खेळलो, की मला खूप आनंद होतो. आम्ही दोघी भांडलो, की मला ती नकोशी वाटते.'

**याच धर्तीवर नवीन शाळा**

भाषा-केंद्रात मातृभाषेच्या विकासासाठी मुलांना मदत करण्यासाठी वेगवेगळ्या पद्धती हाताळून पाहिल्या जातात. या अनुभवातून असं म्हणता येईल, की शासनमान्य पाठ्यक्रमाची भाषाभ्यासाची उद्दिष्टं या पद्धतींनी साध्य होऊ शकतात. ती उद्दिष्टं शासनानं १९८८ साली प्रकाशित केलेल्या 'प्राथमिक शिक्षण अभ्यासक्रम' या पुस्तकात दिली आहेत. त्यांतील काही पुढीलप्रमाणे (पृष्ठ ३६ वर):

- श्रवण, भाषण, संभाषण, वाचन (प्रकट आणि मूक) आणि लेखन या कौशल्यांची जोपासना
- विद्यार्थ्यांची आकलनशक्ती आणि अभिव्यक्तिकौशल्य विकसित होणे
- योग्य उच्चार करण्याचे कौशल्य विकसित होणे
- शब्दसंग्रह वृद्धिंगत होणे
- अवांतर वाचनाची गोडी निर्माण होणे
- विविध साहित्यप्रकारांचा परिचय होणे
- दैनंदिन जीवनातील भाषाव्यवहारासाठी आवश्यक ती कौशल्ये विकसित होणे.
- आस्वादक्षमता, निर्मितिक्षमता, मूल्यभाव यांची जोपासना होणे
- राष्ट्रप्रेम, न्याय, समता, सहकार्य, इत्यादी गुण वृद्धिंगत होणे

सध्याच्या शाळांमधे वर्गातल्या मुलांच्या संख्येमुळे आणि अन्य कारणांनी येणाऱ्या बंधनांमुळे शासनानं ठरवलेली ही उद्दिष्टं साध्य करणं कठीण झालेलं दिसतं. ही उद्दिष्टं साध्य करणं शक्य आहे, हा आत्मविश्वास हे आमच्या भाषाकेंद्राच्या अनुभवाचं फलित आहे.

याच धर्तीवर अशा प्रकारच्या शिकवण्याच्या पद्धती सर्वच विषयांसाठी वापरल्या जातील, अशी एक शाळा सुरू करण्याची ना.ग. नारळकर प्रतिष्ठानची योजना आहे.

**ना.ग. नारळकर प्रतिष्ठान, विद्या, ९३/२ ए गनगोटे पथ, एरंडवणे, पुणे ४११००४**

# 'र' चे राज्य

नीलिमा गुंडी.

"आई, फुर्र करतेस ना ?" मुलीने मला विचारले.

मी मिक्सर कधी चालू करणार, असे तिला विचारायचे होते. 'मिक्सर' हा शब्द तिला माहीतही आहे; पण त्याच्या चालवण्याच्या क्रियेतील 'फुर्र' आवाजावरून तिने त्याच्यासाठी तेच नाव पसंत केले असावे.

या 'फुर्र'च्या वापरामागे आणखी एक कारण असे, की सध्या 'र' या अक्षराचा पाठपुरावा करण्यात ती गुंतलेली असते. तिला 'र' चा एकेरी उच्चार जमत नाही. 'र'चा साहजिकच 'ल' होतो. तो उच्चार चुकीचा आहे, हे तिला आता कळते. पण नुसता 'र' म्हणता तर येत नाही. यातून तिचा तिनेच मार्ग शोधून काढला आहे. तिला स्वतःलाच बोलता बोलता हे लक्षात आले आहे, की तिला 'र'चा अर्धा उच्चार (जोडाक्षरातील उच्चार) येतो. आणि द्वित्त 'र' ('र' चा जोर देऊन उच्चार) ही येतो. या दोन्ही पद्धतींनी 'र' सापडला, की त्याचा पुन्हा पुन्हा उच्चार करण्याचा खेळ खेळण्यात ती रंगून जाते. 'कुर्डया' हा पदार्थ हल्ली तिला त्याच्या उच्चारामुळेच विशेष आवडू लागला असावा. 'पांढरा'चे 'पांढ्रा' आणि 'हिरवा'चे 'हिर्वा' करून ती आपल्यापरीने 'र' ला उच्चारातून निसटू देत नाही. तिच्या या खेळाला चालना देण्यासाठी मी एक गाणे रचून दिले आहे :

'राक्षस होता अललडुर्र  
झोपला होता ढाराढूर  
त्याच्या कानात केले कुर्र  
तो ओरडला गुर्रगुर्र'

हे गाणे ती वेळीअवेळी गात असते आणि घरात 'र' चे राज्य चालू असल्याचे एकप्रकारे घोषित करत असते.

६/७०, लोकमान्यनगर, नवी पेठ, पुणे ४११०३०

## चित्रकलेची भाषा

सोबतची दोन चित्रे पाहा. डावीकडचे चित्र अर्वाचीन युरोपीय धाटणीच्या परिदर्शनातून, आणि उजवीकडचे चित्र प्राचीन ईजिप्शियन धाटणीला अनुसरून काढले आहे. आता कल्पना करा, की एकाच चौरस तलावाची ही दोन चित्रे एक पाश्चात्त्य आणि एक ईजिप्शियन पाहत आहेत.



परिदर्शनातून काढलेले डावीकडचे चित्र पाहून ईजिप्शियन त्यावर कदाचित अशी टीका करील :

'हे चित्र पार चुकलेले आणि घोटाळयात पाडणारे आहे ! मूळचा चौरसाकृती तलाव कसा वाकडातिकडा काढला आहे. त्याच्या काठावरची झाडे कशी समोरासमोर आणि सारख्या अंतरावर सरळसोट उभी आहेत, शिवाय ती सारख्या उंचीची आहेत. चित्रात मात्र सावळागोंधळ-काही झाडे पाण्यात, तर काही बाहेर, काही उभी, तर काही तिरपी झुकलेली, काही उंच, तर काही ठेंगणी.'

यावर पाश्चात्त्य प्रेक्षकाने, समजा, उत्तर दिले, की ईजिप्शियन धाटीच्या चित्रातच खरे तर गोंधळ आहे - तलाव असा काढला आहे, की जणू आपण विमान त्याच्या अगदी डोक्यावर नेऊन त्या विमानातून तो पाहत आहोत आणि झाडे अशी काढली आहेत, की जणू ती जमीनदोस्त झाली आहेत.

ईजिप्शियन प्रेक्षकाला हे उत्तर पटणार तर नाहीच, उलट तो अतिशय बुचकळयात पडेल.

परिदर्शक चित्रणाचे हेच तर कोडे आहे - त्या पध्दतीने वस्तू यथातथ्य दाखवायच्या, तर त्या अयथातथ्य दाखवाव्या लागतात.

चित्रणाच्या वेगवेगळया भाषा असतात, हेच खरे !

[रूडॉल्फ आर्न्‌हाइम, **आर्ट अँड व्हिज्युअल पर्सेप्शन : ए सायकॉलजी ऑव्ह द क्रिएटिव्ह आय,** बर्कली : यूनिव्हर्सिटी ऑव्ह कॅलिफोर्निया प्रेस, १९६४, पृष्ठ ७६ वरून]





अनुक्रमणिका

# अक्षरयात्रा नव्हे अक्षययात्रा।

**तारा भवाळकर**

**ए** स्.टी.मधला प्रवास हा एक साक्षात वैताग असतो. अशा वैतागात असतानाच शेजारच्या बाईच्या पोरानं मोठ्ठा ट्या हॉँऽऽ फोडला. पोर नेणतं. मग पोराची आई, बाप यांचे समजावण्याचे आवाज आणि तसतशी पोराची चढती पट्टी. एकच गदारोळ सुरू! वैतागाची परिसीमा झाली अगदी! आणि तेवढ्यात बाजूच्या बाकावरून एक पोक्त बायकी आवाज आला,

'आगंऽऽ असं अरळ अरळ काय धरतीस पोराला? चांगलं वटीत घ्ये, म्हंजे आपसूक राहील.'

'अरळ अरळ', 'वटीत', 'आपसूक' सगळ्या शब्दांनी मला खेचून घेतलं आणि भोवतालच्या कोलाहलाचा 'आपसूक'च विसर पडला. अगदी, अलगद उचलून त्या शब्दांनी मला पस्तीस-चाळीस वर्षांमागे नेऊन गावाकडच्या आजीच्या घरी नेऊन सोडलं.

हे सगळे थेट आजीचे शब्द! तेव्हा त्यांचं वेगळेपण जाणवलंच नव्हतं - जेवणं झाली, की आजी आम्हांला हात आचवून या' म्हणून सांगायची. आता म्हणजे हात, तोंड सगळं 'धुवा' - धोबीघाट झालाय् सगळा! आणि मग जाणवलं 'किती सहज आपल्यासमोर भाषा बदलली आहे, अगदी आपलीसुद्धा भाषा बदलली आहे.

## घर संपलंच...

सगळं घरच बदललं ना! घर बदललं, की घराचे वासेही फिरतात, तसं झालंय् हल्ली! म्हणजे 'घर' संपूनच गेलंय्. आपण सगळे बहुधा 'फ्लॅट' मध्ये जातो. आपआपल्या फ्लॅटमधे. सगळंच फ्लॅट-सपाट वाटायला लागतं. घराचं कुलूप किल्लीनं उघडण्याऐवजी 'लॅच् की' नं आपण फ्लॅट उघडतो आणि प्रथम 'हॉल' मध्ये जातो. मग 'बेसिन' शी जाऊन 'फ्रेश' होतो. आजीच्या वेळी मोरीत जाऊन हात-पाय चांगले खंगाळून येत होतो. स्वयंपाकघर हद्दपार होऊन 'किचन' आलं. न्हाणीघर, देवघर, शेजघर, माजघर, सोपा, कोठी, सज्जा, कुंपण सगळं घरच हरवलं आणि त्यांची जागा बाथरूम, बेडरूम, स्टोअर रूम अशा पाश्चिमात्य शब्दमंडळींनी घेतली आहे. त्याचपाठोपाठ मग चूल, वैल, ओटा, भानुशी (भानवसा), काटवट सगळंच गेलं. स्वयंपाकघरातले कितीतरी पात्रविशेष भाषेतून हद्दपार झाले. बुडकुलं, टोप, तसराळं, डेगचं, गडू, तपेलं, कासंडी, तपेली, बत्ता (मोठे तपेले), घंगाळ, पितळी, सगळे दुर्मीळ होत गेले. तांब्या, गडवा, लोटी यांतले बारकावे संपले, फडताळ, देवळी, कोनाडा केव्हाच नाहीसे होऊन 'कपाट' सुद्धा दुर्मीळ होत चाललं. भगुलं, पातेलं, लंगडी यांतला भेद पुसट

होत सगळीच भांडी, 'पातेलं' या सामान्यरूपात समाविष्ट होत चालली, तात्पर्य काय, की एक 'घर' जाऊन 'फ्लॅट' आला, की सगळीच भाषा बदलली. पाटपाणी संपून डायनिंग टेबल, ब्रेकफास्ट, डिनर असं सगळं घरातही सुरू झालं. लुगडी, चोळ्या, झबली-टोपडी आणि कुंच्याही इतिहासजमा होऊन सगळे बालकांचे वस्त्रविशेष 'बेबी फ्रॉक' या एकाच शब्दात सामावले.

## शब्द अंतर्धान पावले

स्वयंपाकघराचं 'किचन' झाल्याबरोबर स्वयंपाक घरातले (खरा बोलीतला उच्चार 'सैपाघर') कित्येक पदार्थ अंतर्धान पावले. 'निखारा' संपल्यामुळं 'हारोळी' आणि 'भाकर' पोरांना मिळेनाशी झाली. 'धिरडं' आणि 'गुळवणी' बायकोला मारणाऱ्या नवऱ्याच्या गोष्टीपुरतीही राहिली नाही. सगळ्याचा 'डोसा' होऊन गेला. फार तर 'आंबोळी' कुठं कुठं ऐकू येते, तेवढीच! 'सांजा', 'शेंगोळी' ही विस्मृतीत चालली. ग्रामीण भागातली गावजेवणंही आता लाडू-जिलेबीची झाल्यानं 'तेलच्या' आणि 'गुळवणी' या शब्दांचा सुद्धा वास येईनासा झाला. पाकक्रियेतल्या शेकणे, आहाळणे, निखाऱ्यात भाजणे अशा अनेक प्रक्रिया संपल्या. सारवणं, पाखडणं, वैचणं, घोळणं, भरडणं, कुटणं सगळं संपलं. एक मिक्सर आल्यानं कुटणं, वाटणं, खरडणं, सडणं सगळं एक झालं आणि ते शब्द आता विस्मरणाच्या वाटेला लागले आहेत. 'वॉशिंग मशीन' आल्यानं धोपटणे, आपटणे, चुबकणे, घासणे, घसरा मारणे, खळबळणे, खंगाळणे, (लुगडं) उभं करणे या सगळ्या क्रिया व तज्जन्य शब्द संपुष्टात आले. चिरणे, किसणे, कोचणे, खवणे या क्रियांतले भेद पुसट झाले. हे सगळं घरातलं!

आता थोडं बाहेर आलं, तर वस्त्रविशेषवाचक शब्दही अंतर्धान पावताना दिसतात. 'परकर-पोलकं' संपलंच. उरला तो 'पेटिकोट' आणि 'ब्लाऊज'! सदरा, बंडी, अंगरखा संपले. चपलाहार, पोहेहार, मोहनमाळ, जोंधळी पोत, तांदळी पोत, सरी, ठुशी, चिंचपेटी अशा गळ्यातल्या अलंकारांतले बारकावे संपून 'नेकलेस' या एका शब्दात सगळे गळ्यातले अलंकार सामावले गेले; आणि कानातले सगळे अलंकार झाले इअरिंग्ज. डूल, झुबे, चौफुला, बुगडी, लवंग, लोलक, द्राक्षपान संपले - एक 'कुडी' तेवढी कशीबशी टिकून आहे.

अय्या, इश्श, अव्वा, इस्, अगबाई, बायोऽऽ, या बया सगळी उद्‌गारवाचकं संपली.
असे एक की दोन किती म्हणून शब्द सांगावेत! कितीतरी वाक्प्रचार आणि म्हणी भाषेतून संपत चालल्या आहेत!

भाषा सतत प्रवाही असते. बदलती असते. सतत बदलत राहणं हे भाषेच्याच नव्हे, तर कोणत्याही सजीवाचं लक्षण आहे. पण मराठीच्या बाबतीत दुर्दैवाने 'बदल' झालेले फारसे





अनुक्रमणिका

दिसत नाहीत. कारण बदल होणं म्हणजे जुनं नाहीसं झालं, तरी जुन्याची जागा घेणारं नवं नवं येत राहणं-तेही एक झाडाला अनेक फांद्या फुटाव्यात, तसं. पण मराठीच्या बाबतीत नुसतं खच्चीकरणच दिसतं आहे. जुने शब्द, वाक्प्रचार झपाट्याने विस्मरणात जात आहेत, त्यांची जागा घेणारे नवे नवे शब्द मराठीत येताना दिसत नाहीत. उलट, अनेक अर्थच्छटांचे विविध शब्द नाहीसे होत आहेत आणि त्या सर्वांचा ढोबळ अर्थ सांगणारा एखादा इंग्रजी शब्द तेवढा प्रचारात येतो आहे. परिणामी मराठीचा संकोच अनेक पातळयांवर होतो आहे. नवशिक्षित आणि उच्चस्तरीय सर्वच पालकांना आपली मुलं मराठी माध्यमाच्या शाळेत शिकणं कमीपणाचं वाटतं आहेच. पण दैनंदिन जीवनातही गरज नसताना अनावश्यक असे अनेक इंग्रजी शब्द वापरायची 'खोड' साथीच्या रोगासारखी ग्रामीण भागापर्यंत पसरते आहे. परवा एक नव्यानं संसाराला लागलेली मुलगी वांग्याची रस राखून भाजी करण्याऐवजी वांग्याच्या 'ग्रेव्ही' चं कौतुक करायला लागली. तेव्हा मला वांग्याच्या भाजीत उगीचच 'नळी' दिसायला लागली. मग ग्रामीण भागात इंग्रजी शब्दांचा सोस तर विचारू नका. तिथं म्हणजे 'आमच्या मिसेस् सर्व्हिस करतात. मुलं 'स्कूल' मध्ये जातात आणि इथंही आता सर्व्हंटचा प्रॉब्लेम फार डिफिकल्ट होऊ लागला आहे,' त्याला काय करायचं?

'रेडिओवरचं' आणि दूरदर्शन' वरचं मराठी (आणि हिंदीही) ऐकणं ही कानांना शिक्षा होते आहे. दूरदर्शन वर दुपारच्या (जे सहसा लावले जात नाहीत.) कार्यक्रमांतल्या 'हिंदी'मध्ये क्रियापदं जेमतेम हिंदीत असतात. बाकी 'बच्चोंको स्टोरी सुननेमें इंटरेस्ट आता है'-छाप हिंदी चालूच असतं.

असं सगळीकडून देशी भाषांवरच आक्रमण होतं आहे. पुराचा लोंढा कुठं आणि कसा थोपवून धरायचा, ते कळेनासं झालंयू. मातृभाषेमागची मातृत्वभावनाच संपत चालली आहे की काय, अशी शंका वाटते. मातृत्वभावनेतल्या 'ममत्वा'ला ओहोटी लागल्यासारखं झालं आहे. मातृभाषेचा प्रारंभ होतो नातेवाचक शब्दांपासून! पण सध्या 'आई-बाबा' दुर्मीळ होत जाऊन खेड्यापाड्यांतही 'मम्मी-डॅडी' च्या हायब्रीडचं पीकच उदंड वाढत चाललं आहे. नातेवाचक शब्दांबाबत शहरातून तर आणखी एक नवाच प्रकार दिसतो. परवापरवापर्यंत वडिलांचे मित्र काका असत. आईच्या मैत्रिणी 'मावशी' असत. त्यांच्या जागा 'अंकल' आणि 'आँटी' नं घेतली. त्यालाही बरेच दिवस झाले. आता सख्खी मावशी असली, तरी ती 'माझी मावशी' अशी ओळख नसते, तर 'ही माझ्या आईची बहीण'. असा प्रकार एका 'उच्च स्तरात' सुरू झालेला दिसतो. मग त्याच चालीवर 'डॅडींचे भाऊ', 'डॅडींची बहीण', 'आईचा भाऊ', 'त्यांची मुलं' असा जमाना सुरू झाला आहे. फार तर चुलत, मावस, आते, मामे सगळ्या भावंडांची वासलात एका 'कझीन' च्या बोचक्यात होते. इंग्रजी भाषा अर्थसधन, तिच्यामध्ये

सूक्ष्मार्थ व्यक्त करणाऱ्या अनेक शब्दच्छटा असतात, म्हणून एकीकडे तिचं कौतुक करीत असतानाच मातृभाषेत अनेक सूक्ष्म अर्थच्छटा असलेले शब्द आणि त्यामागच्या वस्तू, नाती अस्तित्वात असताना ते शब्द मोडीत काढणे याला करंटेपणा म्हणू नये, तर काय म्हणावे? आणि पुन्हा त्याची खंत वाटणं तर सोडाच; पण त्याचं भानही नसावं, याला काय म्हणायचं?

शब्दांचं हरवणं हे केवळ ध्वनिसमुच्चयांचं हरवणं नसतं. ते त्यामागच्या भावसमुच्चयांचं हरवणं असतं. खंत आहे, ती त्याची! 'देशी' जीवनाविषयीचाच 'भाव' हरपत चालल्याची! रूढार्थानं अनक्षर असलेल्या बहिणाबाईनं शब्दामागचा भाव आणि त्याचा दर्शक उच्चार यांचा अभावितपणे आलेला अनुबंध किती सहजपणे सांगितला होता!

'माय म्हनता म्हनता,
व्हटालागी व्हट भिडे।
बाबा म्हनता म्हनता,
क्येवडं अंतर पडे?'

आता हे अंतर मायभाषेसाठीच वाढत चाललं आहे.

जीवनाच्या बदलत्या ओघात काही वस्तू काही संकल्पना संपतात, म्हणून त्यांचे वाचक शब्दही संपतात. पण नवीन संकल्पना व नव्या वस्तूंबरोबर नव्या शब्दांचीही भाषेत भर पडते, ही स्वाभाविक घट-भर भाषेला चैतन्य देत असते. परंतु दिवसेंदिवस 'देशी' पणाचं भान दैनंदिन जीवनातूनच संपत चाललं आहे. उलट, त्याविषयी एक न्यूनगंड वाढतो आहे. म्हणजे 'साहेब' या देशात असताना आपण 'आतून' जेवढे 'देशी' होतो, तेवढे किंवा त्यापेक्षा अधिक 'साहेब' आपल्या देशातून गेल्यावर आपण अधिक 'परदेशी' झालो आहोत. हे 'परदेशीपण' अधिक केविलवाणं आहे. म्हणजे असं, की 'आपल्यांत' राहण्याचा आपल्याला सर्वार्थानं न्यूनगंड वाटतो आहे. परदेशी तंबूतही धड प्रवेश नाही, तिथंही दुय्यमत्व घेऊन देवडीवरच्या शिपायासारखंच ताटकळावं लागतं आहे. दुर्दैव हे, की ते ताटकळणं भूषणाचं वाटू लागलं आहे. अशात देशी भाषेचा 'बोली' मधला कस आपण आपल्या बेफिकिरीनं, मूर्खपणानं गमावतो आहोत.

म्हणूनच 'पोराला अरळ अरळ न घेता वटीत घेतलं' की पोर शांत होईल, हे म्हातारीचं सांगणं मला अनेक अर्थांनी भावलं. पांढरपेशी 'मांडी'पेक्षा बोलीमधली 'ओटी' (वटी) अधिक ओलावा देणारी आहेच. पण मायेच्या कुशीची सुरक्षिततासुद्धा त्यात आहे. 'मांडी' तशी

उघडीच - 'ओटीपोटात' घेणारी.

अक्षरांच्या वाटा अक्षयवाटा व्हायचा मार्ग जातो, तो असा 'बोली'तून! मायबोली दैनंदिन जीवनात जितकी समृद्ध होईल, तितकी 'अक्षरं' सामर्थ्यशाली होतील. अक्षरं सामर्थ्यशाली व्हायची असतील, तर ती बोली बोलणारा समाज जीवनातल्या अनेक क्षेत्रांत 'स्व-तंत्रपणे' आघाडीवर असायला हवा. स्व-तंत्र प्रज्ञेचा आविष्कार जीवनाच्या विविध क्षेत्रांत झाला, की तोच जिवंत अनुभव आपोआप शब्दरूप घेईल.

त्या शब्दांचा झरा असेल कठोर परिश्रमाच्या अनुभवांच्या पाझरात. नुसत्या शब्दांना तसा काय अर्थ असतो? बोलणाराची, भावानुभूतीच शब्दरूप घेते. म्हणून ती समृद्ध, समर्थ भावानुभूती हीच खरी अक्षय अक्षरवाट असणार आहे.

**३, स्नेहदीप, आंबेडकर रस्ता, सांगली ४१६ ४१६. (दै. पुढारी'मधून)**

---

**चुकीची दुरुस्ती**

भाषा आणि जीवन १०:१ हिवाळा १९९२ चे मुखपृष्ठ प्रख्यात चित्रकार श्री. श्याम देशपांडे यांनी तयार केले होते. त्यांच्या नावाचा निर्देश त्या अंकाच्या अनुक्रमणिकेत राहून गेला होता.त्याबद्दल आम्ही दिलगीर आहोत. श्री. श्याम देशपांडे यांनी पत्रिकेवरील लोभापोटी वर्ष १० च्या सर्व अंकाची मुखपृष्ठे मोठ्या आत्मीयतेने तयार केली आहेत. त्याबद्दल आम्ही त्यांचे कृतज्ञ आहोत.

**– संपादक**

# वाक्यविचारातील एका ज्वलंत क्षेत्राचं साक्षेपी आणि विचारप्रवर्तक भाषाविश्लेषण

Marathi Syntax : A study of reflexives. By Kashi Wali, Patiala : Indian Institute of Language Studies, 1990. 154pp. Rs. 120.

**परीक्षणलेखक : स्मिता जोशी***

डॉक्टर काशी वाली यांचं Marathi Syntax : A study of reflexives. (मराठी वाक्यविचार : निजबोधकांचा अभ्यास) हे ताजं पुस्तक, त्यांनी दहा वर्षांपूर्वी जे काम केलेलं होतं, त्यावर आधारलेलं आहे. या पुस्तकातला मजकूर प्रथम लिहिला गेला, त्यानंतरच्या काळात भाषाविज्ञानाच्या आजच्या क्षेत्रामध्ये खूपच बदल झालेले आहेत. त्यामुळे या पुस्तकात हाताळलेले काही प्रश्न आता काही तेवढे महत्त्वाचे राहिलेले नाहीत, आणि ज्यांच्यावर वैयक्तिक सुटीसुटी विश्लेषणं आधारलेली होती, ती तंत्रंही आता वैचारिक दृष्टीनं उपलब्ध राहिलेली नाहीत. या पार्श्वभूमीवर वाक्यविचाराच्या सद्यःकालीन उपपत्तींच्या संदर्भात या कामाचं मोल तरी काय, असा प्रश्न कोणी विचारू शकेल.

डॉ. वालींना या क्षेत्रात झालेल्या बदलांची पूर्ण कल्पना आहे. आपल्या या पुस्तकाच्या उपोद्घातात इतक्या दीर्घ कालावधीनंतर हे पुस्तक प्रसिद्ध करण्यामागची समर्थक कारणं त्यांनी दिली आहेत. आज वाक्यविचाराच्या क्षेत्रात निजबोधकांचा अभ्यास हा एक ज्वलंत विषय आहे, हे त्यांनी म्हटलं आहे, ते बरोबरच आहे. मराठी निजबोधकांसंबंधी पारंपरिक व्याकरणावरील पुस्तकांतून जे काही आढळतं, त्याखेरीज दुसरं कोणतंही लिखाण उपलब्ध नाही, हेही त्या लक्षात आणून देतात. आणि ही पारंपरिक पुस्तकं भाषेच्या विविध रचनांमधील निजबोधकांच्या पद्धतशीर अभ्यासाची जागा घेऊ शकत नाहीत. तेव्हा डॉ. वालींचं म्हणणं असं आहे, की आजच्या संशोधनाची चौकट कोणती का असेना, मराठीतील निजबोधकां-संबंधीची या पुस्तकातील सामग्री ही निदान पुढच्या संशोधनाला तरी उपयुक्त ठरेल.

याबाबतीत मला डॉ. वाली यांचं म्हणणं पटतं. औपपत्तिक भाषाविज्ञानाच्या क्षेत्रातील संशोधकांना याची सखेद जाणीव आहे, की आजच्या ज्वलंत विषयाशी संबंधित नसलेली सामग्री ही नेहमी विसरली जाते. ज्यांच्या मदतीनं नवीन उपपत्तींचा कस लागू शकेल, अशी कितीतरी महत्त्वाची उदाहरणं आज या तऱ्हेनं गहाळ झाल्यात जमा आहेत. त्यामुळे

..................................

* परीक्षण लिहिताना पीटर सेल्ज यांचा सल्ला आणि टीकाटिप्पणी यांचा मला उपयोग झाला, त्याबद्दल मी कृतज्ञ आहे.

काळजीपूर्वक नोंदवलेली सगळी सामग्री ही प्रकाशित केलीच पाहिजे; आणि संशोधकांच्या भावी पिढ्यांना उपलब्ध करून दिलीच पाहिजे, मग तिच्या मागची औपपत्तिक चौकट जुनावलेली का असेना. सध्याच्या नवाळलेल्या औपपत्तिक दृष्टिकोनांतूनही मराठी निजबोधकांची वस्तुनिष्ठ माहिती अतिशय रोचक ठरणार आहे. नैसर्गिक भाषेतील निजबोधक प्रक्रियांसंबंधीच्या काही आधारभूत समजुतींनाच ती धक्का देते. मेरी डॅलरिंपल यांनी (वालींच्या मूळ संशोधनातील सामग्रीवर आधारलेल्या आणि स्टॅन्फोर्ड विद्यापीठाला सादर केलेल्या आपल्या अलिकडच्या शोधप्रबंधामध्ये) हे दाखवून दिलं आहे, की मराठीत भिन्न शर्ती (म्हणजे निजबोधकाने वाक्यातील कोणत्या नामपदबंधाचा निर्देश होतो, यासंबंधीचे नियम) पाळणारी दोन प्रकारची निजबोधकं आहेत, ही साधी गोष्टच घ्या. ती, निजबोधकाच्या निर्देशाचे नियम हे संपूर्ण भाषेला लागू असून विशिष्ट निजबोधकापुरते मर्यादित नसतात, असे मानणाऱ्या काही उपपत्तींना आव्हान देते. मराठी निजबोधकांसंबंधीची ही सामग्री आज मोठ्या प्रमाणावर प्रचलित असलेल्या आणखी एका समजुतीला धक्का देते. निजबोधक आणि सर्वनाम ही परस्परांशी पूरक विनियोगात असतात अशी एक समजूत आहे. उदा., पुढील इंग्रजी वाक्य पाहा.

(१) John[1], saw him[1]*, / himself[1],

(या लेखातील सर्व उदाहरणांमध्ये नामानंतर येणारे १,२ हे आकडे कोणती नामं एकाच व्यक्तीचा बोध करतात, हे दाखवतात. * ही खूण ते वाक्य व्याकरणाला धरून नसल्याचं दाखवते. उदा.,वरील वाक्यात कर्ता, कर्म एकाच व्यक्तीचा बोध करतात, असं दाखवायचं असलं, तर himself उपलब्ध आहे. पण him त्याज्य ठरेल.) निजबोधक आणि सर्वनाम यांच्यांतील पूरक विनियोगाची ही कल्पना मुळात प्रतिनिधिव्यवस्थांच्या (anaphoric systems) लाघवाच्या कल्पनेवर आधारित आहे. (प्रतिनिधिव्यवस्थांमध्ये सर्वनामं, निजबोधकं आणि 'एकमेक' यांसारखी अन्योन्यबोधकं यांच्याशी संबंधित नियम मोडतात.) मराठीत दोन निजबोधकं आहेत, असं म्हटल्यावर त्यांपैकी कोणत्या निजबोधकाशी सर्वनाम पूरक विनियोगात राहील, हे स्पष्ट होत नाही.

मराठी निजबोधकांच्या संदर्भातील ह्या सामग्रीचं महत्त्व स्वीकारलं, तरी हा जुना अभ्यास मुळात काही बदल न करता प्रकाशित करण्यात काही उघड स्वरूपाचे तोटे आहेत. डॉ. वालींच्या पुस्तकातील काही विश्लेषणांचं स्वरूप पाहता, अनिर्णायक स्वरूपाची, धूसर किंवा सिद्धिलक्षी (global) अशी उपपादनं भाषाविज्ञानात पत्करली जातील, किंबहुना ती आवश्यक असतात, असा वाचकांचा ग्रह होतो. (धूसर (fuzzy) ही पारिभाषिक संज्ञा असून डॉ. वालींची विश्लेषणं त्याज्य ठरवण्यासाठी ती संज्ञा वापरण्यामागे उद्देश नाही.) पण हा ग्रह योग्य नव्हे. अशा प्रकारची उपपादनं बहुतेक वेळा अतिशय विवाद्य ठरलेली असून केवळ शेवटचं अस्त्र म्हणूनच ती वापरली जातात. गेल्या दशकभरातील प्रगतीमुळे त्यांपैकी बरीचशी

सिद्धिलक्षी आणि धूसर उपपादनं अनावश्यक ठरलेली आहेत,[१] औपपत्तिक गृहीतकांपेक्षा अनुभवनिष्ठ घटितं श्रेष्ठ असतात, हे मला मान्य आहे. जर अनुभवनिष्ठ घटितांमधून निर्विवादपणे अनिर्णायक उपपादनंच शक्य असतील, तर भाषावैज्ञानिकांना आपल्या औपपत्तिक डोलाऱ्यात बदल करावाच लागेल; पण डॉ. वालींच्या पुस्तकात नोंदवलेल्या वस्तुस्थितीच्या रेट्यामुळे मूलभूत औपपत्तिक गृहीतकांचा त्याग करावा लागेल आणि धूसर, सिद्धिलक्षी अनिर्णायक उपपादनांचा समावेश करावा लागेल, असं मला वाटत नाही. माझी बरीचशी विधानं म्हणजे अर्थातच मागून सुचलेलं शहाणपण आहे, हे कबूल करावंच लागेल.

पत्रिकेच्या वाचकांना डॉ. वालींच्या पुस्तकाच्या सर्वसाधारण हेतूचा परिचय करून दिला पाहिजे. हे पुस्तक औपपत्तिक भाषावैज्ञानिकाच्या दृष्टीने अतिशय उपयुक्त असलं, तरी ते सामान्य वाचकांसाठी नाही. भाषाविज्ञानाच्या तत्त्वज्ञानातील मूलभूत प्रश्नांची चर्चा या पुस्तकात केलेली नाही. भाषाविज्ञानाच्या क्षेत्रातील काही तांत्रिक प्रश्नसुद्धा बौद्धिक कुतूहल बाळगणाऱ्या वाचकांसाठी उपयुक्त आणि रोचक करता येतील; पण या पुस्तकाचा तो उद्देश नाही. या पुस्तकात मराठीतील दोन निजबोधकांचे निरनिराळ्या रचनांच्या संदर्भात प्रकट होणारे गुणधर्म निर्धारित केलेले असून, विस्तारित प्रमाणभूत उपपत्तीच्या (Extended Standard Theory) दृष्टीने त्यांचं विश्लेषण केलेलं आहे.[२] यातील काही सामग्री मराठी

.................................

१. वाक्यरचनेच्या जनकसूत्री सिद्धान्ताच्या क्षेत्रात झालेल्या ऐतिहासिक बदलांचं स्वरूप चांगलं समजण्यासाठी, त्याचप्रमाणे सिद्धिलक्षिता आणि धूसरता या अधिसैद्धिन्तिक प्रश्नांच्या चर्चेसाठी फ्रेडरिक न्यूमायर यांचं Linguistic Theory in America हे पुस्तक पाहा. या पुस्तकात एका उत्कृष्ट सूचीचाही समावेश आहे. 'सिद्धिलक्षी' या संकल्पनेचा उलगडा नंतरच्या विवेचनात येईल.

२. चॉम्स्कीच्या Aspects of the Theory of Syntax या पुस्तकात जे प्रतिरूप Model देण्यात आलेलं आहे, त्याला 'प्रमाण उपपत्ती' Standard Theory असं म्हटलं गेलं. चॉम्स्कीच्या Remarks on Nominalization या निबंधात सुचवलेल्या सुधारणा केल्यानंतर या प्रतिरूपाला 'विस्तारित प्रमाणभूत उपपत्ती' Extended Standard Theory असं संबोधण्यात येऊ लागलं. या 'विस्तारित प्रमाणभूत उपपत्ती' मध्ये उत्पादक शब्दसंग्रहाची कल्पना स्वीकारली असून, शब्दाचं एका प्रवर्गातून दुसऱ्या प्रवर्गात रूपान्तर करणाऱ्या रचनान्तरणांचा त्याग करण्यात आलेला आहे. त्यानंतर 'विस्तारित प्रमाणभूत उपपत्ती'नुसार रचनान्तरणांच्या क्षमतेवर पुष्कळ निर्बंध घालण्यात आले. रिक्त प्रवर्गांचा स्वीकार करून काही लोपात्मक आणि स्थानपरिवर्तनात्मक रचनान्तरणं टाळण्यात आली. वालींचं पुस्तक 'विस्तारित प्रमाणभूत उपपत्ती'वरच आधारलेलं असलं, तरी त्यात हे नंतरचे बदल हिशेबात घेतलेले नाहीत. कारण त्यांमागचं काम आधी पूर्ण झालेलं होतं.

वाचकाला केवळ स्वतंत्रपणे देखील लक्षवेधक वाटेल. कारण सामान्य वाचकाला आपल्या भाषेची पूर्वी कधीही लक्षात न आलेली गुंतागुंत समजण्याच्या दृष्टीनं तिचा उपयोग होईल; परंतु ही सामग्री उपपत्तीच्या तांत्रिक गुंतागुंतीच्या आणि विशिष्ट तपशिलाखाली काहीशी हरवली आहे. या पुस्तकाच्या पहिल्या प्रकरणात या अभ्यासात वापरलेल्या वाक्यव्यवस्थेच्या तंत्रांचा धावता परिचय करून दिलेला आहे, हे खरे; पण या प्रकरणाचा उद्देशच मुळी 'विस्तारित प्रमाणभूत उपपत्ती' चे वैयक्तिक नियम आणि निर्बंधप्रकारांसाठी उपयुक्त संदर्भ देणे एवढाच असून त्या उपपत्तीची गृहीतकं आणि क्षमता यांची समग्रतेनं ओळख करून देणं हा नाही.

या पुस्तकाच्या प्रकरण दोनमध्ये 'स्वतः' या निजबोधकाच्या सीमांकनशर्ती सांगितल्या असून 'तो ती ते' या सर्वनामांच्या सीमांकनशर्तींबरोबर त्यांची तुलना केली आहे. डॉ.वालींनी असं प्रतिपादन केलेलं आहे, की प्रतिनिहित नामपदबंध (एखादं सर्वनाम अथवा निजबोधक ज्याचं प्रतिनिधित्व करतं, असं वाक्यातील मूळचं नाम. उदा.,वरील वाक्य क्र. १ मधील John हे नाम.) हा निजबोधकाच्या अगोदर येतो, आणि तो त्यावर नियंत्रण ठेवतो. (म्हणजे निजबोधक ज्या वाक्यात येतं, त्याच वाक्यात येतो अथवा समावेशक वाक्यात येतो) प्रतिनिहित (antecedent) हा कर्ताच असावा लागतो, असंही त्यांनी प्रतिपादन केलेलं आहे. परंतु त्यांनी दाखवून दिलेले निजबोधकांचे हे गुणधर्म जागतिक भाषांच्या संदर्भात अनन्यसाधारण नाहीत. 'स्वतः'च्या खरोखरच लक्षणीय आणि रोचक असलेल्या गुणधर्मांची चर्चा तिसऱ्या प्रकरणात करण्यात आलेली आहे. 'स्वतः'च्या सीमांकनशर्तींची गुंतागुंत तर ते दाखवतातच; पण शिवाय, त्या गुणधर्मांच्या संदर्भात डॉ.वालींनी जी स्पष्टीकरणं दिलेली आहेत, ती औपपत्तिक दृष्ट्या विवाद्य स्वरूपाची आहेत; या दोन कारणांसाठी त्या गुणधर्मांचा बारकाईनं अभ्यास केला पाहिजे.

त्यांपैकी पहिला गुणधर्म, वाली जिला 'व्यववधानकारी कर्ता नसण्याची शर्त' असं म्हणतात, तिच्याशी संबंधित आहे. वाली असं दाखवून देतात, की समाविष्ट वाक्यातील 'स्वतः' हे निजबोधक जेव्हा स्वतः कर्ता असतं, तेव्हा त्याचा प्रतिनिहित हा समावेशक वाक्यातील कर्ता असतो, हे जरी खरं असलं, तरी त्या दोहोंच्या मध्येच जर एखादा व्यवधानकारी कर्ता असेल, तर मात्र समाविष्ट वाक्यातील निजबोधक समावेशक वाक्यातील कर्त्याचा निर्देश करू शकत नाही. उदाः , क्र.२ आणि ३ ही उदाहरणं (म्हणजेच वालींची उदाहरणं क्र. १ आणि २, पृ.५२) समाविष्ट वाक्यातील निजबोधकाच्या दोन प्रकारच्या सीमांकनशर्ती स्पष्ट करतात.

(२) मिनीला[१] वाटतं, की [स्वतःला[१] खूप दागिने असावेत].

(३) मिनीने[१] रवीला[२] सांगितले, की [त्याने[२] स्वतःला[*१/२] दोष देऊ नये].

येथे क्र. २ च्या वाक्यातील समाविष्ट वाक्यातील निजबोधक 'स्वतः'चा, समावेशक

वाक्यातील कर्ता 'मिनी' हा प्रतिनिहित आहे. त्या दोहोंमध्ये दुसरा व्यवधानकारी कर्ता नाही. पण क्र. ३ मध्ये मात्र समाविष्ट वाक्यातील निजबोधक 'स्वतः' आणि समावेशक वाक्याचा कर्ता 'मिनी' यांच्यामध्ये 'त्याने' हा व्यवधानकारी कर्ता येत असल्याने 'मिनी' हा 'स्वतः'चा प्रतिनिहित होऊ शकत नाही.

आता अडचणीची बाब अशी, की व्यवधानकारी कर्ता असूनसुद्धा समावेशक वाक्यातील कर्ता हा समाविष्ट वाक्यातील निजबोधकाचा प्रतिनिहित होण्यात काही बाधा येत नाही. पुढील क्र.४ चं उदाहरण पाहा. (पुढील क्र. ४ क आणि क्र. ४ ख ही उदाहरणं म्हणजे वालींची पृ.५७.५९ वरील क्र.९ व क्र. १० ही उदाहरणं होत.)

(४क).मिनीला[१], (विनूने[२] स्वतःची[१/२] पुस्तके फेकून दिल्याचे) कळले.

(४ख) मिनी[१], (विनूने[२] स्वतःला[१/२] मारल्यावर) रुसून बसली.

क्र. ४ क मध्ये समाविष्ट उपवाक्याचं नामीकरण करण्यात आलं आहे, म्हणजेच त्या उपवाक्याचा नामपदबंध बनवला आहे. क्र.४ख मधील उपवाक्य क्रियाविशेषणीभूत आहे. विस्तारित प्रमाणभूत उपपत्तीनुसार उदाहरणांचे हे दोन्ही प्रकार वरील क्र. २ आणि ३ या उदाहरणांतल्या साध्या 'की'-युक्त उपवाक्यापासून, एका प्रकारच्या वाक्याचं दुसऱ्या प्रकारच्या वाक्यात अथवा पदबंधात रचनांतरण करण्याचे नियम लावून सिद्ध होतात. वालींनी क्र.५ क आणि ५ ख (वालींचे क्र,७ आणि ८, पृ.५४) मध्ये नोंदवलेले वाक्यांचे आणखी दोन प्रकार सांगितलेले आहेत.

(५ क). मिनीने[१],रवीला[२] (०[२] स्वतःला[१/२] दोष न द्यायला) सांगितलं.

(५ ख) (०[२] स्वतःला[१/२] मारणाऱ्या) मुलीला[२] मिनीने[१] ढकलले.

त्यांच्यामध्ये वरवर पाहता व्यवधानकारी कर्ता आढळत नाही; पण या वाक्यांचं विस्तारित प्रमाणभूत उपपत्तीनुसार औपपत्तिक विश्लेषण केल्यानंतर असं दिसतं, की त्यांमध्ये अंतःस्तरावर कर्ता असून, तो रचनांतरणाने गळतो. अधिक स्पष्टतेसाठी मी लुप्त कर्त्याचं स्थान ० या चिन्हानं दाखविलं आहे.

वरील वाक्य क्र.३ मध्ये व्यवधानकारी कर्त्याची अट लागू पडते; आणि वाक्य क्र.४ क, ४ ख, ५ क आणि ५ ख या ठिकाणी ती लागू पडत नाही. हे या अर्थानं, की क्र. ३ साठी कोणतेही रचनांतरणाचे नियम लावावे लागत नाहीत, तर उलट, नंतरच्या वाक्यांमध्ये ते लावावे लागतात. अशा या दोन प्रकारच्या वाक्यांतील फरक वालींनी स्पष्ट केला आहे. त्यांच्या मते व्यवधानकारी कर्ता नसण्याची अट व्यवधानकारी कर्ता जर 'कोऱ्या' वाक्यात - म्हणजे जिथे कोणताही रचनांतरणाचा नियम लावलेला नाही, अशाच 'कोऱ्या' वाक्यात आला, तरच लागू होते.

एखादं वाक्य 'कोरं' आहे, की नाही, हे ठरवण्यासाठी त्या वाक्याच्या सिद्धीची इतिकथा तपासली पाहिजे. ज्या अटी लावताना वाक्याच्या सिद्धीची सर्व पूर्वीची प्रक्रिया हिशेबात घ्यावी

लागते, केवळ सिद्ध वाक्याकडे पाहून भागत नाही अशा सिद्धिलक्षी अटींना 'ग्लोबल कंडिशन्स' असं म्हणतात. सिद्धिलक्षी अटींचा उपयोग करण्यानं वाक्यव्यवस्थेची उपपत्ती अतिसर्वंकष बनली आहे. पण याचमुळे वाक्यसिद्धीच्या इतिकथेच्या सिंहावलोकनावर आधारित अशी ही विश्लेषणं नेहमी विवाद्य ठरलेली आहेत, आणि त्यामुळे गेल्या काही वर्षांत औपपत्तिक भाषाविज्ञानाच्या क्षेत्रात ती त्याज्य ठरलेली आहेत.[३] जर 'स्वतःच्या निजबोधक-आदेशासंबंधीच्या बाबींना अशा सिद्धिलक्षी अटींची गरज असेल, तर सध्याच्या वाक्यव्यवस्थेच्या संदर्भातील उपपत्तीच्या गृहीतकांमध्ये मूलभूत प्रकारचे बदल केले पाहिजेत. परंतु असं दाखविता येईल, की वालींनी सुचवलेली सिद्धिलक्षी अट तशी आवश्यक नाही (याचा अर्थ तिच्याऐवजी पर्यायी स्पष्टीकरण उपलब्ध आहे), आणि ती पुरेशीही नाही (म्हणजे त्यांनी सुचवलेल्या सोडवणुकीने सर्व उदाहरणांचा उलगडा होऊ शकत नाही). पृ. ६४ वर वालींनी पुढील उदाहरण दिलं आहे.

(६) मिनीने[१], रवीला[२] विनंती केली, की [त्याने[१] स्वतःच्या *[१/२] कविता वाचू नयेत.]

हे लक्षात घ्यावं, की वरील वाक्यातील 'त्याने' हा सार्वनामिक कर्ता व्यवधानकारी कर्ता म्हणून काम करू शकतो आणि त्यामुळे निजबोधकाला समावेशक वाक्यातील कर्त्याचं प्रतिनिधित्व आणि निर्देश करण्यापासून रोखू शकतो. तेव्हा जर वालींचं विश्लेषण बरोबर असेल, तर वरील वाक्यातील चौकोनी कोष्टकातील उपवाक्य हे 'कोरं' वाक्य आहे. (म्हणजेच त्याला कोणताही रचनांतरणाचा नियम लावण्यात आलेला नाही) अशी एखाद्याची कल्पना

..................................

३. एरवी तुल्यबळ असलेल्या पण परस्परांशी स्पर्धा करणाऱ्या उपपत्तींमध्ये जी उपपत्ती अधिक सर्वंकष असते, ती कमी इष्ट असते. याचं कारण असं, की अधिक सर्वंकष असलेल्या उपपत्तीमध्ये अधिक प्रकारचे नियम आणि अटी असतात, आणि त्यामुळे ती कमी सर्वंकष असलेल्या उपपत्तींपेक्षा अधिक प्रकारच्या भाषिक (अथवा नैसर्गिक) घटितांचे वर्णन करू शकते. प्रथमदर्शनी ही गोष्ट अधिक सर्वंकष असलेल्या उपपत्तीचा इष्ट गुणधर्म वाटेल, पण कोणत्याही उपपत्तीचं कार्य घटितांचं फक्त वर्णन करणं हेच नसतं, तर भाषांमध्ये (अथवा नैसर्गिक सृष्टीमध्ये) ज्या प्रकारची घटितं घडण्याची अपेक्षा असते. त्यांच्या नेमक्या सीमा निश्चित करणं हे असतं. अधिक सर्वंकष असलेली उपपत्ती कमी सर्वंकष असलेल्या उपपत्तीपेक्षा नैसर्गिक भाषा (आणि नैसर्गिक घटितं) ह्यांच्या वास्तविक सीमा ओलांडते आणि एक प्रकारे अतिव्याप्तीचा दोष पदरी येतो. त्यामुळे अधिक सर्वंकष असलेली उपपत्ती कमी स्पष्टीकरण देणारी असते. ह्याला मी एक उदाहरण देते. वस्तू जमिनीवर किंवा आकाशात कशामुळे पडतात, असं सांगणारी उपपत्ती वस्तू जमिनीकडे ओढल्या जातात, असं सांगणाऱ्या उपपत्तीपेक्षा अधिक सर्वंकष असते. पण भौतिक सृष्टीत जिथे वस्तू जमिनीवरच पडतात, तिथे ही नंतरची उपपत्ती अगोदरच्या उपपत्तीपेक्षा अधिक स्पष्टीकरणक्षम ठरते.

होईल. पण ही कल्पना खरी ठरत नाही. वालींनी स्वीकारलेल्या सैद्धान्तिक चौकटीत सर्वनामं ही सर्वनामीकरणाच्या रचनांतरणाच्या नियमांनीच वाक्यात येऊ शकतात. त्यामुळे हे उपवाक्य 'कोरं' ठरू शकत नाही. वस्तुतः सर्व निजबोधकं निजबोधक-आदेशाच्या रचनांतरणाने सुद्धा वाक्यात येऊ शकतात, आणि वालींनी आपल्या पुस्तकाच्या पहिल्या प्रकरणात ह्याची चर्चाही केलेली आहे. त्यामुळे निजबोधक असलेलं कोणतंही वाक्य, अगदी वरील क्र. ३ चं सुद्धा, हे 'कोरं' वाक्य होऊ शकत नाही. आपल्या शोधप्रबंधात मेरी डॅलरिंपल यांनी वाक्य क्र. ३ आणि वाक्य क्र. ४ व ५ यांमधील फरक दाखवून दिला आहे. क्र. ३ मधील उपवाक्य हे आख्यातलक्षी आहे; म्हणजे त्याला समावेशक वाक्यापेक्षा स्वतंत्र असा काळ आहे; पण क्र. ४ व ५ मध्ये मात्र कंसांतील उपवाक्य अथवा पदबंध यांना स्वतःचा काळ नाही. अनेक भाषांमध्ये निजबोधकांच्या सीमांकनशर्ती ह्या काळाशी सुसंवादी असतात. उदा.,रशियन आणि नॉर्वेजियन. त्यामुळे क्र.३ अणि क्र. ४ व ५ यांतील फरक हा फार विलक्षण आहे, असं नाही.

वालींनी 'स्वतः'च्या ज्या दुसऱ्या गुणधर्माचं विवाद्य स्पष्टीकरण दिलेलं आहे, त्या गुणधर्माचं स्पष्टीकरण सहजासहजी करता येण्याजोगं नाही, आणि त्यामुळे तो गुणधर्म (मला जितपत माहीत आहे, त्यानुसार) सध्याच्या वाक्यव्यवस्थेसंबंधीच्या मांडणीला खरं आव्हान आहे. वालींनी वरील क्र.५ मध्ये आणि खालील क्र. ७ मध्ये दिलेल्या दोन रचनाप्रकारांमधील 'स्वतः'च्या सीमांकनशर्तींची तुलना केली आहे. (हे क्र. ७ चं वाक्य म्हणजे वालींचं पृ.६६ वरील क्र.२३ चं वाक्य होय.) इथेही मी लुप्त कर्त्याची जागा ० या चिन्हानं निर्देशित केली आहे.

(७) मिनीला[१], रवि[२] (०[२] स्वतःचा[१/२*] वैरी) वाटतो.

बाह्यतः क्र.५ क आणि क्र.७ यांच्या संरचना सारख्याच आहेत, असं दिसतं. या दोहोंतला फरक म्हणजे क्र.५ क च्या वाक्यात 'स्वतः' रवीचा निर्देश करू शकतं. पण क्र.७ च्या वाक्यात ते रवीचा निर्देश करू शकत नाही. विस्तारित प्रमाणभूत उपपत्तीच्या सैद्धान्तिक चौकटीनुसार क्र. ५ क आणि क्र.७ या वाक्यांच्या सिद्धींमध्ये फरक आहे. अगोदरच्या वाक्यात (क्र.५क) कंसांतल्या वाक्याचा लुप्त कर्ता 'समान नामपदबंध लोप' (Equi NP Deletion) या रचनांतरणाच्या नियमानुसार गाळण्यात आलेला आहे, कारण तो समावेशक वाक्यातील कर्माचा समनिर्देशी आहे. (त्यामुळे कर्माला जो १,२ आकडा पडेल, तोच त्यालाही पडतो.) क्र.७ च्या वाक्यात कंसांतील पदबंधाच्या लुप्त ० कर्त्यानं समावेशक वाक्याचं कर्म बनण्यासाठी स्थलांतर केलं आहे. त्यासाठी खालच्या कर्त्याचं वरच्या कर्मात उन्नयन या रचनांतरण सूत्राचा वापर झाला आहे. (येथे 'खालच्या' म्हणजे 'समाविष्ट उपवाक्यातल्या' आणि वरच्या म्हणजे 'समावेशक वाक्यातल्या'.) या दोन रचनांमधील 'स्वतः'च्या सीमांकनशर्तींमधील फरकाचा अन्वय वालींनी त्यांच्या भिन्न सिद्धींशी जोडला आहे. त्यांनी





अनुक्रमणिका

त्यासाठी 'साधित कर्माची अट' या नावाची अट पुढे केली आहे. 'साधित कर्माचा नामपदबंध हा जर दुसऱ्या प्रकारे सिद्ध झालेल्या एकसंध रचनेशी साम्य असणाऱ्या अशा संरचनेत अथवा परिस्थितीत आला, तर त्याचा 'स्वतः' नामपदबंधाशी कोणताही संबंध प्रस्थापित होत नाही.'' (पृ. ७०) वाली जिचा निर्देश करत आहेत, ती एकसंध संरचना म्हणजे खाली क्र.८ मध्ये नोंदवलेलं दोन कर्मं असलेलं असाधित केवल वाक्य होय.

(८) मिनीने$^{१}$, रवीला$^{२}$ स्वतःचे $^{१/२*}$ पुस्तक दिले.

या क्र.८ मध्ये 'रवीला' हे कर्म 'स्वतः'चं प्रतिनिहित होऊ शकत नाही.

साधित कर्माची अट, म्हणजे जिला उपमितिमूलक अट म्हणतात, ती होय. म्हणजे असं- 'क्ष' आणि 'य' या दोन संरचनांमध्ये विशिष्ट अट लागू होणारी खरी योग्य संरचना 'य' असताना, केवळ 'क्ष' ही संरचना 'य' सारखीच दिसते. म्हणून तिलाही ती अट लागू करून तिच्यामध्ये काही बदल घडवून आणला जातो, अशा अटींना उपमितिमूलक अटी (analogical conditions) म्हणतात. अशा तऱ्हेचे उपमितिमूलक नियम आणि अटी खूप विवाद्य ठरतात, कारण त्यांच्यामुळे उपपत्ती अनिर्णायक स्वरूपाची होते. एखाद्या संरचनेच्या बाबतीत उपमितीवर आधारित कार्यासारखा जो भाग दिसतो, त्याची निर्णायक स्पष्टीकरणात परिणती झाली पाहिजे. निर्णायक स्पष्टीकरणांच्या आधारे आपण अंदाज बांधू शकतो. आता इंग्लिशच्या वाक्यव्यवस्थेच्या क्षेत्रातील एका उदाहरणाच्या साहाय्याने मी मला काय म्हणायचं आहे, ते स्पष्ट करते. इंग्लिशमध्ये himself या निजबोधकाला त्याच उपवाक्यातल्या प्रतिनिहित पदाची गरज असते. क्र.९ क मधील वाक्याच्या ग्राह्यतेवरून आणि क्र.९ ख च्या त्याज्यतेवरून ते स्पष्ट होईल. ह्याच्या नेमकी विरोधी परिस्थिती क्र.९ ग मध्ये आहे.

(९ क) John$^{1}$, showed Bill$^{2}$ himself$^{1/2}$

(९ ख) *John$^{1}$, wanted [Bill to shave himself$^{1}$,]

(९ ग) John$^{1}$, promised Bill [to shave himself$^{1}$,]

(९ घ) John$^{1}$, promised Bill [0$^{1}$, to shave himself$^{1}$,]

(१० क) *John$^{1}$, showed him$^{1/2}$/Bill$^{2}$

(१० ख) John$^{1}$, promised Bill$^{2}$ [0$^{1}$, to shave him$^{*1/2}$]

क्र. ९ ग च्या वाक्यात समाविष्ट वाक्यातील निजबोधक समावेशक वाक्यातील कर्त्याचा निर्देश करू शकतं. याचा अर्थ, उपमितीची भाषा वापरून सांगायचा झाल्यास - ९ ग मधील मिश्र संरचना ९क प्रमाणे केवल रचनेसारखी वागताना आढळते. पण एवढयावरच विश्लेषण थांबवलं, तर त्यानं हाती काहीच लागत नाही. त्याऐवजी असं सुचवण्यात आलं आहे, की - कंसांतील उपवाक्याला कर्ता असला पाहिजे आणि तो कुठल्यातरी पातळीवर वरह शी समनिर्देशी असला पाहिजे, आणि तो 'समानपदलोप' Equi deletion या रचनांतरणानं निजबोधक-आदेशानंतर गळून पडतो. म्हणजे ९ग ची संरचना ९ घ शी अधिक जुळणारी





अनुक्रमणिका

मानली जाते. हे स्पष्टीकरण उपमितिमूलक स्पष्टीकरणापेक्षा अधिक सरस आहे. कारण त्यात अंदाजक्षमता आहे. इंग्रजीतील केवल रचनेत, साधं सर्वनाम त्याच्या वाक्यात कोणत्याही नामपदबंधाचा निर्देश करू शकत नाही. क्र.१० क मध्ये त्याचं उदाहरण आहे. आता क्र. १० ख मधील संरचना ही क्र. ९क सारखी केवल संरचना मानली, तर क्र. १० ख मधील him हे सर्वनाम Bill चाच निर्देश Equi deletion का करतं आणि John चा का नाही, हे स्पष्ट होऊ शकत नाही. ह्याच्या उलट 'समानपदलोप' Equi deletion च्या नियमानुसार केलेल्या स्पष्टीकरणाला नेमक्या ह्याच सीमांकनशर्तीची अपेक्षा आहे. कारण ज्या समाविष्ट वाक्यात रैस हे पद येतं, त्याच्या बाहेर Bill हे पद येतं, आणि John हे पद त्या वाक्याचा कर्ताच आहे. (म्हणजे ० कर्ता हा John चा समनिर्देशी आहे.)

या उपमितिमूलक तंत्राबरोबर वालींनी दिलेली साधित कर्माची अटसुद्धा संरचनेच्या सिद्धीच्या इतिहासावर अवलंबून आहे. त्यामुळे साधित कर्माची अट ही क्र. ५ क आणि क्र.७ यांमधील फरकाचं स्पष्टीकरण देण्याच्या दृष्टीनं दुप्पट अडचणीची ठरते.

साधित कर्माची अट ही सापेक्षतया अडचणीची ठरते आणि सध्याच्या वाक्यविचाराची कोणतीही उपपत्ती क्र.७ मधील 'स्वतःचा वैरी' हा पदबंध 'रवी' या पदाचा निर्देश का करू शकत नाही, याचं स्पष्टीकरण देऊ शकत नाही. या दोन वस्तुस्थितींमधील विरोध स्पष्ट करण्याची गरज आहे. सध्याच्या सर्व उपपत्ती 'रवि' हाच त्या पदबंधाचा कुठल्या ना कुठल्या तरी पातळीवर कर्ता आहे, असं मानतात. असं असेल, तर मग साधित कर्माची अट स्वीकारायला कोणती हरकत आहे, असं एखादा विचारू शकेल. माझा विरोध हा त्या अटीतील सिद्धिलक्षित्वापेक्षा तिच्यात गृहीत धरलेल्या उपमितीच्या स्वरूपाला आहे. हे लक्षात घेतलं पाहिजे, की वालींच्या मतानुसार निजभाषकाला क्र.७ च्या वाक्यामध्ये अशा उपमितीची कल्पना करता येते, पण क्र.५ च्या वाक्यामध्ये नाही. वालींनी या दोन वाक्यांतला फरक आवर्जून स्पष्ट केला आहे. तो म्हणजे, पहिल्या वाक्यात (क्र.७) साधित कर्म असून दुसऱ्या वाक्यात अंतर्निहित कर्म आहे. पण तरीसुद्धा निजभाषक क्र.७ आणि क्र.८ मध्ये उपमिती किंवा सादृश्याची कल्पना का करू शकतो; पण क्र.५ क आणि क्र.८ मध्ये मात्र का करू शकत नाही याचं स्पष्टीकरण मात्र यातून मिळत नाही. वास्तविक पाहता क्र.५ क आणि क्र.८ या दोन्ही वाक्यांत अंतर्निहित कर्म आहे, असं मानल्यावर ती दोन्ही अधिक समान असून, उपमिती किंवा सादृश्यमूलक संबंध प्रस्थापित करण्याच्या दृष्टीनं अधिक अनुकूल असायला पाहिजेत. हा फरक स्पष्ट करू शकेल, असं सादृश्य उभं करण्याच्या संदर्भात कोणतेच निर्बंध घातलेले नसल्यानं, उपमितिमूलक स्पष्टीकरण हे अनिर्णायक स्वरूपाचं असतं. असाधित कर्माची अट स्वीकार्य नाही, याचं कारण हे आहे, की कोणतंही अनिर्णायक सादृश्याच्या भाषेतलं स्पष्टीकरण हे मुळी स्पष्टीकरणच नव्हे. ते फक्त स्पष्टीकरणासारखं दिसतं, एवढंच. सोडवणुकीचा आभास हा कोणतीही किंमत देऊन टाळलाच पाहिजे, कारण त्यामुळे त्यावर

आधारित असं भावी संशोधन शंकास्पद ठरतं. मला असं वाटतं, की क्र.७ मधील 'स्वतःचा वैरी' हा पदबंध 'रवी' या पदाला का निर्दिष्ट करत नाही, हा प्रश्न भावी संशोधनावर सोडून देणं हेच या क्षेत्राला उपकारक ठरेल. तरी डॉ. वालींनी जी कसून छाननी केलेली आहे, तीमुळेच हे मजेदार उदाहरण उजेडात आलं, हे त्यांच्या संशोधनाचं श्रेय मानलं पाहिजे.

प्रकरण चारमध्ये वालींनी 'आपण' या निजबोधकाच्या मूलभूत गुणधर्मांचं विवेचन केलं आहे. 'आपण' बद्दल असं दाखवण्यात आलं आहे, की निजबोधकाच्या वाक्यापेक्षा समावेशक वाक्यात येणारा कर्ता हा 'आपण'चा प्रतिनिहित असतो. पण ज्या वेळी 'आपण' ला 'विषयी' अथवा 'करता' असे उत्तरयोगी लागतात, त्या वेळी मात्र त्याच्याच वाक्यातील कर्ता हा त्याचा प्रतिनिहित असू शकतो. वालींनी 'आपण'च्या सीमांकनशर्तीची 'तो' / 'ती' / 'ते' या सर्वनामांशी तुलनाही केलेली आहे. त्यांनी असं दाखवून दिलं आहे, की ज्या ज्या संरचनांमधून सर्वनामं येऊ शकतात, त्यांपैकी बऱ्याच संरचनांमधून निजबोधक येऊ शकतं. 'आपण'चा हा गुणधर्म सीमांकनशर्तीच्या उपपत्तीच्या आजच्या ज्या अनेक मांडण्यांमधून भाषेतील सर्वनाम आणि निजबोधक ही पूरक विनियोगात येतात, असं मानण्यात येतं, त्यांच्या दृष्टीनं मोठंच आव्हान आहे. अलीकडे चॉम्स्कीच्या सीमांकनशर्तीविषयक लेखनात काही किरकोळ बदल करण्यात आले असून, इंग्रजीतील ज्या काही संरचनांमध्ये सर्वनाम आणि निजबोधक ही पूरक विनियोगामध्ये नसतात, त्यांचा त्यांमध्ये समावेश केला आहे. पण हे बदलसुद्धा मराठीमधील ज्या उदाहरणांमध्ये, सर्वनाम आणि 'आपण' हे निजबोधक एकाच जागी येऊ शकतात, त्यांच्या संख्येनं फार मोठ्या असलेल्या गटाचं स्पष्टीकरण करण्यास असमर्थ आहेत. अशा प्रकारे वालींचा हा 'आपण' या निजबोधकाचा अभ्यास अतिशय मोलाचा आहे.

या पुस्तकाच्या शेवटच्या प्रकरणात डॉ. वालींनी मराठीतील प्रयोजक रचनांच्या गुणधर्मांचा शोध घेतला आहे. त्यांचं असं मत आहे, की मराठीतील प्रयोजकांची संरचना ही अंतःस्तरावर मिश्र स्वरूपाची आहे. या भूमिकेसाठी जी कारणं सांगण्यात येतात, ती दोन क्षेत्रांतून येतात : (१) मराठीतील प्रयोजक प्रक्रियांची उत्पादकता; आणि (२) प्रयोजक संरचनांतील दोन निजबोधकांच्या सीमांकनशर्ती. पहिल्या कारणाबद्दल सांगायचं झाल्यास, डॉ. वाली असं सांगतात, की मराठी प्रयोजक रचनांना आणखी प्रयोजक प्रक्रिया होऊ शकते, आणि त्याचं पर्यवसान, केवल रचनांत ज्यांना साम्य आढळणार नाही, अशा संरचना अस्तित्वात येण्यात होतं. उदाहरणार्थ, खालील क्र.११ चं वाक्य पाहा. त्यात एकावर एक अशा दोनदा प्रयोजक प्रक्रिया झालेल्या असून, त्यांत दोन मध्यस्थ नामपदबंध आहेत.

(११) मिनीने लीलाकडून शीलाद्वारा विनूला मारववले.

(१२) मिनीने लीलाकडून शीलाद्वारा विनूला घरी पाठवले.

पण वाली जे म्हणतात, की क्र.११ सारख्या उदाहरणांना केवल रचनांत जोड आढळत नाही, हे काही अगदी बरोबर नाही. त्यासाठी उदा., क्र.१२ पाहा. तेव्हा पदबंध संरचनेच्या

ज्या मूलभूत नियमांनी क्र.१२ च्या वाक्याची सिद्धी होते त्याच नियमांनी क्र.११ च्या वाक्याची पण अगदी थेट (म्हणजे रचनांतरणं न वापरता) सिद्धी होऊ शकते.

निजबोधकांच्या सीमांकनशर्तींच्या आधारे प्रयोजक संरचनांचं अंतर्निहित मिश्र स्वरूप स्पष्ट करणारी कारणं फार गुंतागुंतीची आहेत. मांडणीच्या स्पष्टतेखातर वाली तथाकथित अकर्मक प्रयोजकं आणि सकर्मक प्रयोजकं यांमध्ये फरक करतात. अकर्मक प्रयोजकांमध्ये दोन नामपदबंध असून, सकर्मक प्रयोजकांमध्ये तीन नामपदबंध असतात.

सकर्मक प्रयोजकांमध्ये वालींनी प्रयोजक-प्रक्रियांच्या तीन नमुन्यांचा विचार केला आहे. त्यांची उदाहरणं पुढील क्र.१३-१५ मध्ये पाहा.

(१३) प्रयोजक कर्त्याकडून मध्यस्थाला निजबोधक-आदेश.

मिनीने[१], * स्वतःकडून[१] / * आपल्याकडून[१] लीलाला हसवले.

(१४) मध्यस्थाकडून (ग्राहक) कर्म नामपदबंधाला निजबोधक-आदेश :

मिनीने विनूकडून[२] *स्वतःला[२] / *आपल्याला[२] हसवले.

(१५) प्रयोजक कर्त्याकडून ग्राहक कर्माला निजबोधक-आदेशः

मिनीने[१], विनूकडून स्वतःला[१] / आपल्याला[१] कोचावर बसवले.

डॉ.वाली असं सांगतात,की क्र.१३ आणि क्र.१४ मधील आकृतिबंध पाहता प्रयोजकांची संरचना ही जणू काही केवल स्वरूपाची असते, असं वाटायला लागतं. निजबोधक 'आपण' च्या दोन उदाहरणांतील सीमांकनाच्या बाबतीत आणि क्र.१४ मधील 'स्वतः'च्या सीमांकनाच्या बाबतीत हे खरं आहे. निजबोधक 'आपण' हे त्याच्याच वाक्यातील कर्त्याचा प्रतिनिहित म्हणून स्वीकार करत नाही. त्यामुळेच क्र.१३ च्या वाक्यातील 'आपण' चं सीमांकन त्याज्य का आहे, हे स्पष्ट होतं. तसंच, दोन्ही निजबोधकांना कर्त्याच्या रूपातच प्रतिनिहितं हवी असतात, यावरून क्र.१४ मधील दोन्ही सीमांकनं त्याज्य का आहेत, याचं स्पष्टीकरण मिळतं. तथापि, क्र.१३ मधील 'स्वतःकडून' या पदाची वाक्यातील कर्त्याला सीमांकित होण्यातील असमर्थता मात्र एक कोडंच आहे. डॉ.वाली सांगतात,की हे सीमांकन त्याज्य ठरतं, याचं कारण क्र.१६ मधील केवल संरचनेच्या उपमितीच्या आधारे स्पष्ट करता येतं. परंतु क्र.१६ चं वाक्य त्याज्य का आहे, याचं स्पष्टीकरण मात्र त्यांच्याकडून राहून गेलेलं दिसतं.

(१६). *मिनीने[१] स्वतःकडून[१] लीलाला पुस्तक पाठवले.

वालींच्या मते क्र.१५ मधील 'आपल्याला' चं प्रयोजक-कर्त्याशी सीमांकन ग्राह्य आहे, हेच 'प्रयोजकाची रचना केवल स्वरूपाची असते' ही उपपत्ती त्याज्य ठरवण्याचं एक महत्त्वाचं कारण आहे. 'आपण' या निजबोधकाला जेव्हा 'विषयी' किंवा 'साठी' हे शब्दयोगी जोडलेले नसतात, त्या वेळी ते स्वतःच्या वाक्यातील कर्ता प्रतिनिहित म्हणून स्वीकारू शकत नाही. क्र.१३ आणि क्र.१४ या उदाहरणांनी स्पष्ट केलेली प्रयोजकांची वरवरची केवल संरचना आणि क्र.१५ मध्ये स्पष्ट होणारी त्यांची वरवरची मिश्र संरचना यांची संगती लावली पाहिजे. वालींचं

विश्लेषण ह्या समस्येची सोडवणूक करू शकत नाही. त्यांनी फक्त एवढंच सांगितलेलं आहे, की हे फरक स्पष्ट करणारं व्याकरण हे अधिक गंतागुंतीचं असेल, आणि अशा व्याकरणाची कोणतीही सूचना तेव्हाच्या आरंभीच्या काळात मिळत नाही. क्र.१३-१५ मधील सीमांकनांनी निर्माण केलेली समस्या लक्षणीय असून, माझ्या समजुतीप्रमाणे सध्याच्या उपपत्तींमध्ये तिचं सरळ आणि साधं उत्तर मिळत नाही.

अकर्मक प्रयोजकांची संरचना ही अधिक सोपी आहे. कारण तिच्यात दोहोंपेक्षा अधिक नामपदबंध नसतात. वालींनी या रचनांतील निजबोधकाच्या सीमांकनाचा जो नमुना दिला आहे, तो क्र.१७ मध्ये पाहावा.

(१७) मिनीने' स्वतःला' / *आपल्याला' सजवले.

क्र. १७ हे अशा तऱ्हेनं अकर्मक प्रयोजकाच्या केवल रचनेच्या बाजूनं उपोद्बलक ठरतं. वालींनी या नमुन्याचा संबंध येणे सारख्या साध्या द्विकर्मकाशी उपमिती म्हणून जोडला आहे, आणि अकर्मक प्रयोजकांमध्ये मिश्र स्वरूपाची अंतर्निहित रचना असते, असं म्हटलं आहे. अकर्मक प्रयोजकांना मिश्र ठरवताना त्यांनी तीन कारणं दिली आहेत. त्यांच्या मते अंतर्निहित केवल रचनेच्या मुद्द्यावरून प्रयोजकांच्या साधित रचनेचं स्पष्टीकरण होऊ शकत नाही. प्रयोजक क्रियापदामध्ये एक साधं क्रियापद आणि प्रयोजक रूपिम असतो. पण अलीकडे मात्र मिश्र रचनेसाठी हे कारण इतकं समर्थ मानलं जात नाही. अलीकडे पदपातळीवरील साधना रूपविचारातच होऊन जातात, असं मानलं जातं. त्यांच्यामुळे आर्थिक संरचनेत सहवर्ती बदल होतात, हे खरं, पण वाक्याच्या व्याकरणिक संरचनेत त्यांचे पडसाद उमटत नाहीत. अकर्मक प्रयोजकं ही अंतःस्तरावर मिश्र आहेत, असं मानण्यामागे वालींचा उद्देश त्यांची सकर्मक प्रयोजकांशी मोट बांधणं हा आहे. वर उल्लेख केल्याप्रमाणे, सकर्मक प्रयोजकाची रचना मिश्र स्वरूपाची असते, असं जे सूचित करण्यात आलेलं आहे, त्यालाच फार कमी स्पष्टीकरणात्मक आधार देण्यात आला आहे. त्यामुळे अकर्मक प्रयोजकांच्या मिश्र रचनेचं स्पष्टीकरण करण्यासाठी त्यांचा उपयोग होऊ शकत नाही. अकर्मक प्रयोजकांमधील अंतर्निहित मिश्रतेचं वालींनी सांगितलेलं तिसरं कारण या रचनांमधील क्रियाविशेषण वाचकांच्या संदिग्धतेशी संबंधित आहे.

(१८) मिनीने विनूला हळूहळू उठविले.

(१९) मिनीने विनूला हळूहळू मारले.

उदाहरण क्र.१८ मध्ये 'हळूहळू' हे क्रियाविशेषणपद विनूला उठवण्याच्या क्रियेचा विशेष धर्म सांगतं किंवा विनूच्या उठण्याच्या क्रियेचा विशेष धर्म सांगतं. ही जी संदिग्धता आहे, तिच्या उलट क्र.१९ या केवल रचनेमध्ये अशी संदिग्धता नाही, याकडे वाली मुद्दाम लक्ष वेधतात. क्र.१९ या वाक्याचा मिनीने विनूला हळू मारलं, एवढाच अर्थ होऊ शकतो. पण म्हणजे विनूचं मार खाणं हळू, की मिनीच्या मारण्याची गती हळू, अशी संदिग्धता तिथे नाही.

विनूचं हळू मारं खाणं हे मिनीच्या हळू मारण्यापेक्षा वेगळं काढलं जाणार नाही. क्र.१९ मधील क्रियाविशेषणपद असंदिग्ध का आहे, याचं दुसरं एक उत्तर आपल्याला उपलब्ध आहे. एखाद्याला मारणं आणि त्याला मार बसणं या दोन्ही प्रक्रिया एकच आहेत. आपण त्या वेगळ्या काढत नाही, कारण त्या वेगळ्या नाहीतच. अशाही काही केवल संरचना असतात, की ज्या ठिकाणी दोन क्रिया लगेच होत नसतात. उदा., 'पाठवणे' हे क्रियापद. हे लक्षात घेतलं पाहिजे, की 'पाठवणे' हे 'उठवणे' च्या वर्गात पडू शकतं, कारण दोहोंमध्येही दोन वेगवेगळ्या कृतींचा बोध करून देण्याची क्षमता आहे, पण 'पाठवणे' ला 'मारणे' च्या वर्गात घालता येत नाही. उदा.,पुढील वाक्यं पाहा :

(२० क) मिनी विनूला उठवत होती, पण विनू उठला नाही.

(२० ख) मिनी विनूला घरी पाठवत होती, पण विनू घरी गेला नाही.

(२० ग) * मिनी विनूला मारत होती, पण विनूला मारलं गेलं नाही.

आता क्र.२१ च्या वाक्यातील क्रियाविशेषण 'हसत-हसत' हे संदिग्ध आहे.

(२१) मिनीने विनूला हसत हसत घरी पाठवले.

सारांश, वालींनी अकर्मक प्रयोजकांच्या मिश्रतेसाठी दिलेल्या कारणांपैकी कोणतंही कारण चिकित्सापूर्वक पाहणीत टिकत नाही.

सकर्मक प्रयोजकांमध्ये काही केवल रचनेचे गुणधर्म असतात आणि काही मिश्र रचनेचे गुणधर्म असतात, असं वालींचं मत असल्यांचा उल्लेख वर येऊन गेला आहे. आपण हेही पाहिलं आहे, की त्यांनी या फरकाची स्पष्ट शब्दांत (हे किंवा ते) संगती लावलेली नाही, पण या दुहेरी गुणधर्मासाठी काहीशी धूसर उपपत्ती त्यांनी मांडली आहे. आणखी एका बाबतीत एक धूसर स्वरूपाची सोडवणूक आवश्यक आहे, असं वालींनी सुचवलं आहे. अंतर्निहित रचनांमध्ये आढळणाऱ्या उपवाक्यांच्या जोडीच्या बाबतीत त्यांनी ते सुचवलं आहे. वालींनी मराठीतील अशा अंतर्निहित संरचनांची एक चढती भांजणीच दिली असून, तिला त्यांनी अनेक चाचण्या लावल्या आहेत. अंतर्निहिततेच्या दृष्टीनं संरचनांचा एक सतत बदलत जाणारा रंगपट्टाच आहे, असं त्यांनी दाखवून दिलं आहे. एका टोकाला सर्व चाचण्यांनी संपूर्णपणे केवल ठरलेली एक संरचना असते, तर त्याच्या विरुद्ध टोकाला सर्व चाचण्यांनी संपूर्णपणे मिश्र ठरलेली संरचना असते. या दोहोंच्यामध्ये रचनांच्या मिश्रत्वाच्या संख्येनं वाढत जाणाऱ्या चाचण्या उत्तीर्ण होणाऱ्या संरचना असतात. या साच्यात विचारात घेतलेल्या संरचना आणि चाचण्या यांची संख्या खूप मोठी आहे, आणि त्यामुळे त्यांपैकी प्रत्येकीवर टीकाटिप्पणी करणं अशक्य आहे. त्यांपैकी काही रचनांच्या पर्यायी स्पष्टीकरणांचा खाली विचार केला आहे.

चाचणी क्र.१ : 'न-न' चाचणी - डॉ. वाली असं सांगतात, की अकर्मक प्रयोजक या चाचणीला उतरतं, पण मूल सकर्मक मात्र त्या चाचणीला उतरत नाही. पुढील उदाहरणातील विरोध लक्षात घ्यावा.

(२२) न मिनीने रवीला रडवले. न तो रडला.

(२३) *न मिनीने रवीला बडवले, न तो बडला.

क्र.२३ मधील पहिलं उपवाक्य मूल सकर्मक आहे. पण क्र.२३ हे वाक्य चुकीचं आहे, कारण मराठीत 'बडला' यासारखं क्रियापदच नाही. पण पुढील क्र.२४ चं वाक्य मात्र ठीक आहे.

(२४) न मिनीने गवताने पेटी भरली, न पेटी भरली.

चाचणी क्र.२ : साधनवाचक - वाली सांगतात, की 'वापरून' यासारखे साधनवाचक पदबंध हे अकर्मक प्रयोजकांच्या ग्राहककर्माच्या नियंत्रणाखाली असतात, असं मानता येणार नाही. (=। या चिन्हाने अर्थविस्तार सूचित झाला आहे). त्यांच्या मते, अकर्मक प्रयोजकं या केवल रचना असतात, असं या चाचणीनं सूचित केलं जातं.

(२५) मिनीने लिलीला फुले वापरून सजवले.

=। *लिलीने फुले वापरली.

हे स्पष्टीकरण बरोबर नाही. कारण खऱ्या केवल अकर्मकांमध्ये दोन वर्ग असल्याचं दाखवता येतं. (१) साधनांवर नियंत्रण ठेवणारा आणि (२) साधनांवर नियंत्रण न ठेवणारा.

(२६) मिनी काठी वापरून चालली.

(२७) *मिनी काठी / वल्हं वापरून बुडली.

फक्त कर्तृवाचक नामपदबंधच साधनांवर नियंत्रण ठेवू शकतो, या वस्तुस्थितीच्या आधारे वरील वाक्यांतील फरक स्पष्ट होतो. वालींचं मूळ लेखन पूर्ण झाल्यानंतर वाक्यविचारातील अर्थाच्या निर्बंधासंबंधी खूपच नवीन माहिती उपलब्ध झाली आहे. वालींनी आपल्या अंतर्निहित संरचनांच्या संचात वापरलेल्या बऱ्याचशा चाचण्यांना अर्थविषयक अटी लागत होत्या, पण त्या चाचण्या या संरचनांच्या वाक्यविचाराबद्दल काहीच सांगत नाहीत. मला असं वाटतं, की आज वाक्यविचारावरील अर्थविषयक अटींची अधिक चांगली समज वाढल्यानंतर संरचनांच्या मिश्रतेचा तरतमभाव मानणाऱ्या धूसर चौकटीची आज आवश्यकता नाही.

या परीक्षणाचा बराचसा भाग वालींच्या काही विश्लेषणांमागील आज कालबाह्य ठरलेल्या औपपत्तिक गृहीतकातील उणिवा दाखवण्यासाठी खर्ची पडला आहे. तरी त्यांच्या या ग्रंथाच्या प्रकाशनाने जी मूल्यवान भर पडलेली आहे, त्याची पोच देणं आवश्यक आहे. दक्षिण आशियातल्या निरनिराळ्या भाषांच्या वाक्यरचनांवर पुष्कळ संशोधन होण्याची आवश्यकता असून, ते संशोधन भाषाविज्ञानाच्या अभ्यासकांना उपलब्ध करून दिलं पाहिजे. या भाषिक समूहातील निरनिराळे नियम आणि निर्बंध यांची विविध परिमाणं निश्चित करण्यासाठी पद्धतशीर अभ्यास हा रोमान्स कुलातील भाषांवरच्या संदर्भातील अलिकडील नवप्रवर्तक कामाइतकाच उत्तेजक ठरणार आहे. वालींच्या पुस्तकानं संबंधित भाषांमधील या प्रकारच्या संशोधनाचे संभाव्य फायदे सूचित केले आहेत.

डॉ. वालींनी मराठीतील बहुविध संरचनांमध्ये दोन निजबोधकं आणि सर्वनाम यांच्या सीमांकन-शर्तींचा अतिशय बारकाव्यांनिशी आणि चिकाटीनं शोध घेतला आहे, आणि अतिशय रोचक आणि आव्हानात्मक सामग्री सादर केलेली आहे. एकमेकांवर अंशतः अतिक्रमण करणाऱ्या सीमांकनशर्ती असलेल्या मराठीतील दोन निजबोधकांचं अस्तित्व सध्याच्या वाक्यविचाराच्या उपपत्तींपुढे आव्हानात्मक प्रश्न उभे करतं. विशेष उल्लेखनीय, म्हणजे उदाहरण क्र.७ मधील 'रवी' या पदाची 'स्वतः' या निजबोधकाचं प्रतिनिहित होण्याची अक्षमता आणि सकर्मक प्रयोजकांमध्ये 'स्वतः' आणि 'आपण' यांचे निजबोधक आदेशानं स्पष्ट झालेले बाह्यतः विरोधी गुणधर्म यांचा नवीन औपपत्तिक गृहीतकांच्या संदर्भात सखोल अभ्यास झाला पाहिजे.

**संदर्भ**


1. Chomsky N. (1965) Aspects of the Theory of Syntax, Cambridge, Mass : MIT Press.
2. Chomsky N. (1970) "Remarks on Nominalization," In Readings in English Transformational Grammar, edited by R. Jacobs and P. Rosenbaum (1970), PP. 184.221. Waltham, Mass : Ginn.
3. New meyer, Frederick (1986) Linguistic Theory in America, 2nd ed. Orlando, Fla : Academic Press.



**भाषाविज्ञानविभाग, स्टॅन्फोर्ड विद्यापीठ, स्टॅन्फोर्ड, कॅलिफोर्निया ९४३०५, युनायटेड स्टेट्स् ऑव्ह अमेरिका**



(मूळ इंग्रजी परीक्षणावरून अनुवाद : कल्याण काळे, मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ४११००७.)

## नवलेखक अनुदान योजना

महाराष्ट्र राज्य आणि संस्कृती मंडळाच्या वतीने नवलेखकांना उत्तेजन मिळावे, म्हणून त्यांच्या प्रथम व द्वितीय पुस्तकाच्या प्रकाशनार्थ अनुवाद देण्याच्या योजनेखाली नवलेखक/कवींकडून साहित्य मागवण्यात येत आहे. नवलेखक/कवी या संज्ञेत, ज्याचे एकही पुस्तक प्रकाशित झालेले नाही किंवा ज्याचे पहिले पुस्तक मंडळाच्या या योजनेतील अनुदानाने प्रकाशित झालेले आहे, अशाच नवलेखक कवींचा समावेश करण्यात येतो. या योजनेतून अनुदान प्राप्त करू इच्छिणाऱ्यांनी अधिक माहितीसाठी 'सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, एन्सा हटमेंट 'डी ब्लॉक', आझाद मैदान, महापालिका मार्ग, मुंबई ४०० ००१' या पत्त्यावर संपर्क साधावा. अर्जाचा नमुना व माहितीपत्रक इ. साठीही याच पत्त्यावर संपर्क साधावा, असे मंडळाचे सचिव श्री. चं. रा. वडे कळवतात.

---

## याला म्हणतात समन्वयबुद्धी!

श्रीयुत मेनन यांनी थंडपणे उत्तर दिले : त्याचं काय आहे, की तुम्हांला आता जे काही सांगणार आहे, त्याच्यावर तुमचा विश्वास बसणार नाही. तेव्हा तुम्ही तो जोक म्हणून समजा पाहिजे तर. मी त्या वेळी आमुद शाळेत होतो, कुब्बी नावाचे शिक्षक भूगोल शिकवत होते - पृथ्वी गोल आहे आणि ती आपल्या आसाभोवती फिरत आहे. आमच्या वर्गातला एक लठ्ठ मुलगा यावर उठून उभा राहिला आणि त्यानं विचारलं, गुरुजी, आमच्या धर्मशिक्षणाच्या वर्गात तर सांगितलं की पृथ्वी सपाट आहे आणि ती उडून जाऊ नये म्हणून देवानं पृथ्वीवर पर्वत ठेवले आहेत; आणि तुम्ही तर सांगता आहात, की पृथ्वी गोल आहे. हे कसं काय ? कुब्बी गुरुजींना यावर काय सांगायचं, ते कळे ना, तेव्हा त्यांनी या मुलाला आमचे हेडमास्तर श्रीयुत सुलेमान यांच्याकडे पाठवलं. श्रीयुत सुलेमान याचं शिक्षण परदेशात म्हणजे रशियात झालं होतं, म्हणे, त्यांनी त्या मुलाला काय सांगितलं असेल ? ते म्हणाले, दोघांचं म्हणणं अगदी बरोबर आहे. भूगोलाच्या वर्गात पृथ्वी गोल आहे, हे बरोबर आहे; तर धर्मशिक्षणाच्या वर्गात पृथ्वी सपाट आहे, हे बरोबर आहे. बाळ, जा तू आता वर्गात परत. श्रीयुत मेनन शेवटी म्हणाले, आहे की नाही ? यावर काहीच न बोलता मी घरी परतलो.

सी. एन्. रामचंद्रन्, शोध, धारवाड, १९७७ (या कन्नड कादंबरीला पूर्व आफ्रिकेतील सोमाली या देशाची पार्श्वभूमी लाभलेली आहे.)

प्रेषक : डॉ. बी. मल्लिकार्जुन, भारतीय भाषा संस्थान, मैसूर ५७०००६

**पैसे भरण्याबद्दल सूचना**

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. चेक 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. मनीऑर्डर कूपनवर किंवा चेकसोबतच्या चिठ्ठीवर पैसे पाठवणाराचे नाव, पत्ता, रक्कम, आणि ती कशापोटी पाठवली, ते अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास, कोणता मिळाला, याचा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ म्हणून भर घालावी. पावती मागाहून पाठवली जाईल.

**पत्रिकेची वर्गणी**

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असेच राहील, हे लक्षात घ्यावे. पत्रिकेचे वर्षात चार अंक निघतात. मात्र १९८३ मध्ये केवळ दोनच अंक निघाले आहेत. पत्रिकेचे चालू वर्षाव्यतिरिक्तचे अंक हवे असल्यास मिळू शकतील. वर्गणीची आकारणी पुढीलप्रमाणे करण्यात येते :

चालू वर्गणी परिषदेच्या सामान्य सभासदांसाठी (सभासद-वर्गणी धरून) वर्षाला ४० रु.
चालू वर्गणी संस्था आणि सभासद नसलेल्या व्यक्ती यांसाठी वर्षाला ६० रु.
सुट्या अंकाला (मग तो चालू वर्षाचा असो , की मागील वर्षांपैकी असो) १५ रु.
परदेशातील व्यक्तींसाठी वर्षाला १० डॉलर.
परदेशातील संस्थांसाठी वर्षाला १५ डॉलर.
सुटा अंक परदेशी पाठवायचा झाल्यास त्याची किंमत ४ डॉलर इतकी पडेल.

**परिषदेची वर्गणी**

सामान्य सभासदाची वार्षिक वर्गणी वर दिली आहे. एका घरात एकापेक्षा अधिक सामान्य सभासद असले आणि त्यांपैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा असला, तर इतर सभासदांनी केवळ २० रु. भरायचे आहेत. उदाहरणार्थ, एका घरात दोन सभासद आणि अंक एक अशी स्थिती असल्यास वर्षाला ४० रु.+२० रु. असे एकूण ६० रुपये भरावे लागतील.

आजीव सभासदत्वासाठी ४०० रु. (परदेशातील व्यक्तीसाठी १०० डॉलर) हितचिंतकासाठी १००० रु. (परदेशातील व्यक्तीसाठी २५० डॉलर) किंवा जास्त; आश्रयदात्यासाठी ५००० रु. (परदेशातील व्यक्तीसाठी ५०० डॉलर) किंवा जास्त. (आजीव, देणगीदार, आश्रयदाता सभासदांना पत्रिकेची वेगळी वर्गणी नाही.

परिषदेचे सभासदत्व व्यक्तीला मिळेल, संस्थेला नाही.

**जाहिरातीसाठी दर**

पूर्ण पान ७५० रु. अर्धे पान ४०० रु., पाव पान २५० रु., शुभेच्छासूचना १०० रु., आवरणपृष्ठ चार १००० रु., आवरणपृष्ठ दोन/तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत चालेल, मराठीत असल्यास उत्तम.

नोंदणी क्रमांक : 040048/83

# महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ

## ललितकलाविषयक प्रकाशने

| प्रकाशनाचे नाव | लेखक | किंमत रु. |
|---|---|---|
| १. लय-ताल-विचार | डॉ. श. वि. गोखले | ८० |
| २. तंजावूर नृत्य प्रबंध | श्री. पार्वतीकुमार | १६५ |
| ३. माझा संगीत व्यासंग | श्री. गोविंदराव टेंबे | २८ |
| ४. संगीत-दर्पण | श्री. गोविंदराव टेंबे | १५ |
| ५. संगीत रत्नाकर भाग १ | प्रा. ग. ह. तारळेकर | २९ |
| ६. संगीत रत्नाकर भाग २ | प्रा. ग. ह. तारळेकर | ३० |
| ७. नाट्यमंडप [भरतमुनिप्रणीत नाट्यमंडपमूचा अनुवाद] | डॉ. र. पु. कुलकर्णी | १५ |
| ८. काश्यपशिल्प ['काश्यपशिल्पम्' या संस्कृत ग्रंथाचा अनुवाद] | डॉ. र. पु. कुलकर्णी | ६० |
| ९. Life & Still Life [केकी मूस यांच्या छायाचित्रांचा संग्रह] | ....... | १०० व १२५ |
| १०. प्रकाशचित्रण : एक कलामाध्यम | श्री. के. बा. गोडबोले | २१० |
| ११. शंकर पळशीकर [चित्रसंग्रह] | ...... | ९० |
| १२. चित्रचिरंतन [श्री. शुभराय महाराज यांच्या चित्रांचा संग्रह] | ...... | ४० |

**साहित्य आणि संस्कृती मंडळाची प्रकाशने खालील केंद्रावर मिळतील :**

१. प्रकाशन व्यवस्थापक, शासन मुद्रण व लेखन सामग्री विभाग, चर्नी रोड, मुंबई ४०० ००४

२. व्यवस्थापक, शासन लेखन सामग्री आणि ग्रंथागार, शहागंज, गांधी चौक, औरंगाबाद ४३१ ००१

३. व्यवस्थापक, शासकीय ग्रंथागार, ५ फोटो झिंको पथ, पुणे ४११ ००१

४. व्यवस्थापक, शासन मुद्रण व ग्रंथागार, सिव्हिल लाईन्स, नागपूर ४४० ००१